१६ वें—

# सामायिक पाठ

परमपूज्य नरेंद्रवंद्य आचार्य
स्वर्गीय श्री कुंथुसागर
महाराज यांचे
पवित्र स्मृतीस
समर्पण

लेखक:
श्री. रावजी नेमचंद शहा,
वकील, सोलापूर.

श्रीवीर ग्रंथ माला, सांगली.

# सामायिकापूर्वी.

( प्रस्तावनालेखकः–प्रा. परशराम कृष्ण गोडे एम्. ए. क्यूरेटर भांडारकर प्राच्यविद्यासंशोधन मंदिर, पुणें. )

धर्म हें मानवी दुःखांची क्षणभर विस्मृति पाडणारें, अफूप्रमाणें गुंगी आणणारें औषध होय असें कांहीं जणांना वाटतें. जोपर्यंत विज्ञानशास्त्र(Science) हें ऐहिक दुःखाचों–आधि–व्याधींची–बिनचूक चिकित्सा करून त्यावर रामबाण असा यशस्वी उपाय सुचवूं शकत नाहीं तोपर्यंत मानवाच्या ठायीं असलेली धर्मश्रद्धा नष्ट होणें शक्य नाहीं. धर्मश्रध्देचा मनुष्याच्या चारित्र्याशीं–जीवनाशीं–फार निकट संबंध येतो. मन वचन काय या तीन्हींची शुध्दि ( पावित्र्य ) ठेवावें असाच जगांतील सर्व धर्म संस्थापकांचा उपदेश आहे. या तीहींपैकीं प्रत्येकाचा परस्परांवर प्रभाव पडत असल्यामुळेंच मानवी जीवनास विशिष्ट वळण लागतें. या त्र्याशिवाय दैव ही एक अजब चीज–शक्ति–आहे. आजपर्यंत कोणाही वैज्ञानिकाला शास्त्रीय संशोधकाला आपल्या परीक्षा पहावयाच्या नलिकायंत्रांत (Test–tube) दैवाला घालून त्याची योग्य व यथार्थ अशी शास्त्रीय चिकित्सा करतां आली नाहीं; व पुढेंही येणार नाहीं; वैज्ञानिकाप्रमाणें पत्रीच्या शहाण्या अशा प्रकांड पंडित ज्योतिषशास्त्रवेत्यालाही या दैवापुढें हात टेकावे लागले आहेत. सारांश, दैव हा एक अनिर्णयात्मक अशा ' एक्स ' नामक वस्तु आहे असेंच म्हणणें भाग पडतें.

अन्य धर्मीयांप्रमाणेच जैन धर्मानुयायांनींही मनवचनकाय या त्रयींच्या शुध्दीकरितां अेक साधा व प्रभावी असा उपाय–विधि–सांगितला आहे. त्यालाच जैनागमांत ' सामायिक ' या नांवानें पूर्व सूरींनीं संबोधिलें आहे. इतर धार्मिक क्रियेप्रमाणेंच गृहस्थी श्रावकांनीं व मुनींनीं 'सामायिक' हें प्रत्यही केलेंच पाहिजे असा जैनाचार्यांचा दंडक आहे. अनुवादकर्ते श्री. रावजी नेमचंद शहा वकील सोलापूर यांनीं सामायिक शब्दाची पारिभाषिक व्याख्या यांत सुस्पष्ट केली असल्यामुळें मी त्यासंबंधीं लिहित नाहीं.

वैदिक-हिंदु-धर्मातील त्रिकालसंध्येप्रमाणेंच 'सामायिक' हाही तीन्ही वेळां करण्याचा विधि जैनाचार्यांनी सांगितला आहे हें उघड दिसतें. ध्यात्याचें (ध्यान-सामायिक-करणाऱ्याचें) ध्येयाशीं-शुध्दात्म्याशीं-एकरूप होणें हेंच सामायिकाचें अंतिम उद्दिष्ट होय. सामायिक करण्याचा हा हेतु अंतरात्मा हा परमात्म्याशीं जेव्हां तद्रूप होतो-अनंताशीं तन्मय होतो-तेव्हांच साध्य होणार हें उघडच आहे.

श्री. शहा वकीलांच्या ग्रंथांत अमितगति आचार्यांचा एक व इतर दोन असें तीन उद्बोधक व उद्बापक सामायिक-पाठ व त्यांचे सुबोध मराठी अनुवाद दिले आहेत. सामायिक करतांना हेच पाठ म्हणण्याचा जैनांत प्रघात आहे.

सर्व धर्मांतूनही प्रार्थनेच्या वेळीं म्हणण्याकरितां पद्यें, स्तोत्रें वगैरे सांगितलेली आढळतात. शहा यांनीं संग्रहित केलेले हे तीन सामायिक पाठ म्हणजे जैन धर्मांतील प्रार्थनापर पद्यें-स्तोत्रें-ईशगीत हेच होत, असें मला वाटतें. मनुष्यामध्ये पाशवी वृत्ति आहे ही गोष्ट कोणालाही नाकबूल करतां येणार नाहीं. पण त्याचेठायी पवित्र असे दैवीगुणही बीजरूपानें वास्तव्य करतात ही गोष्ट मात्र त्याला पटवून द्यावी लागते; समजावून सांगावी लागते. या दैवी गुणांचा विकास करीत करीत स्वतःला-अंतरात्म्याला-परमात्मपदही प्राप्त करतां येते हे सिद्ध करण्याकरितां सामायिकाचाच आश्रय करणें योग्य कां आहे हे यांत दाखविलें आहे प्रत्येक धर्माच्या स्तोत्र वाङ्मयांत प्रार्थनापर गीतांत मानवी प्रवृत्तींना सुविचारांकडे वळविण्याची सुप्त शक्ति आहे हे उघड आहे. स्तोत्र वाङमयांतल्या श्लोकांचें चिंतन केल्यानें भावना-विचार-पवित्र होऊन जीवनाला इष्ट व आदर्श असें वळण लागते जीवनदृष्टी विशाल, उदार व विश्वकल्याणोपकारी बनते चारित्र्य शुद्ध व आदर्श ठेवावें अशी इच्छाशक्ति या सामायिक पाठांतील श्लोकांच्या मननानें प्रामुख्यानें बळावतें, हें निःसंशय!

प्रचाराचा प्रभाव व परिणाम कसा व किती उत्कृष्ट होतो हें आजच्या महायुद्धामुळें संस्काराप्रमाणेंच आज जनतेलाही स्पष्टपणे कळून चुकले आहे. कोडो रुपये खर्चून जगांत प्रचारकार्य हें जें चालू आहे त्यांतील मर्म उघड

आहे. प्रत्येक सरकार या प्रचारकार्याकरितां आपली बरीचशी उत्साहशक्ति खर्च करिते यावरून त्याचे फायदेही स्पष्टपणे त्यांच्या अनुभवास येत असलेच पाहिजेत हें निर्विवाद होय. यावरून शब्दांत विशिष्ट तत्वज्ञानाचे-संस्कृतीचे-परंपरेचे- मनाचे-धर्माचे--पंथाचे अनुयायी बनविण्याचे महनीय सामर्थ्य आहे हें सिद्ध होते. श्रोत्यांच्या मनावर शब्दांचा-अर्थात्-प्रचार-कार्याचा फारच मोठा प्रभाव होऊ शकतो हें प्रत्येकाच्या प्रत्ययास आलेंच आहे; धार्मिक म्हणा किंवा राजकीय अथवा दुसरी कोणतीही मत प्रणाली घ्या; त्याचे विशदीकरण-स्पष्टीकरण-शब्दसामर्थ्याशिवाय इतर कशानेंही होऊ शकणार नाहीं. एक जर्मन तत्ववेत्ता म्हणतो:-'Words are heard and over heard' शृंगारिक व अश्लील वाङ्मयानें मनोवृत्ति भडकून जातात; तर धार्मिक व नीतीपर साहित्यामुळें पापपुण्याचें महत्व कळून, सदाचाराकडे प्रवृत्ति होऊन धार्मिक वृत्ति व सद्भावना बळावतात. भावनेप्रमाणेंच मनःप्रवृत्तीला धरूनच मनुष्याच्या हातून कृति होते. यावरून चारित्र्याची जननी ही आपल्या भावनाच होत हें स्पष्ट होतें. जे वाङ्मय आपण वाचतों किंवा ऐकतों तदनुसार आपल्या विचार प्रवाहाला धरूनच आपला जीवनदृष्टीकोण ठरतो. व त्याचप्रमाणें आपल्या हातून कार्यें भली वा बुरी होवात

ज्याप्रमाणें राष्ट्रगीतामुळें राष्ट्रीयत्व अंगी बाणून, राष्ट्रांत एकी होऊं शकते त्याचप्रमाणें ईश प्रार्थनेनें-सामायिकानेंही आपली मनवचकाया शुद्ध व पवित्र होऊन या त्रयींत एक प्रकारचें दैवी सामर्थ्य-सात्विक-गुण येऊं शकतात. या सामायिक पाठांत विश्वकल्याणोपकारी अशी उदार व समतावादी वृत्ति वृध्दिंगत करण्याची शक्ति आहे. मानवधर्माचें यथार्थ ज्ञान करून देण्याचे सामर्थ्य ईशस्तोत्रांत-पार्थनेंत-आहे. या पाठांतील मंत्रांतच जागतिक ऐक्य करण्याचीं हीं बीजें आहेत

प्रार्थनेंत दंग झालेला भक्त, सामायिक करण्यांत तल्लीन झालेला योगी-स्वतःस विसरून ब्रम्हानंदी-ज्ञानानंदी-निजानंदी लागली टाळी अशी तद्रूपावस्था त्याला प्राप्त होते; स्वतःच्या अंतरात्म्यांत परमात्म्याचें त्याला दर्शन होतें. शुद्ध, बुद्ध चिदानंद स्वरूपाचा तो अनुभव घेऊं लागतो; बाहून

अधिक साध्य काय व कोणते असणार ? स्वतःच्या मोठेपणाची अवास्तव कल्पना ही मानवी कल्याणाच्या मार्गातली एक मोठी धोंड आहे. अहंभाव हरएक प्रकारचा शत्रूच होय. सामाजिक, बौध्दिक किंवा धार्मिक–अशा कोणत्याहि क्षेत्रात त्यागामुळेंच, अहंभाव विसरल्यानेंच, विनयशीलतेनेंच कांही तरी भरीव असें महनीय कार्य होऊं शकते. आत्मार्पण ( Self-surrender ) करणारे महात्मेच साम्राज्य सत्तेला सुद्धां वाकवूं शकतात. ईशभक्तिपरस्तुति स्तोत्रें गातांना किंवा सामायिक करतांना भक्त अथवा ध्याता हा आपल्या मनांतून स्वत्वाची–अहंभावाची–भावना टाकून देऊन देहादिक सर्व वस्तु ह्या परकीय आहेत असें मानतो; याप्रमाणें बहिरात्म वृत्तीचा त्याग केल्यावर त्या सर्वज्ञ व सर्वशक्तिमान वीतरागप्रभूशीं किंवा शुद्ध बुद्ध चिदानंद परमात्म्याशीं आपला अंतरात्मा एकरूप झाल्याची भावना भावतो, चिंततो. अनुभव घेतो, त्यामुळें त्याची आत्मशुद्धि अर्थात् आत्मविकास होऊन त्याला एक प्रकारचें नवें सामर्थ्य, नवें चैतन्य, व नवी दृष्टि प्राप्त होते. त्यालाच आत्मानुभव असेंही म्हणतां येईल; या आत्मानुभवापासून होणारा आनंद स्वसंवेद्य आहे.

अत्यंत प्राचीनकाळीं आपल्या पूर्वाचार्योंनी ही स्थिति स्वतः अनुभविली, की त्यांच्या पूर्णपणें प्रत्ययास आली आणि आपल्या धर्म बांधवांना ही पवित्र वा दिव्य अशी आध्यात्मिक दृष्टि प्राप्त व्हावी म्हणून त्यानीं निरनिराळीं स्तोत्रें, प्रार्थना म्हणण्याचा व सामायिक पाठ, आलोचना, इत्यादि क्रिया करण्याचा उपदेश केला.

सर्व धर्म संस्थापकानीं पूजा, प्रार्थना, स्तोत्रें आदि पठण व मनन करण्याची आज्ञा केली आहे. रे. इ. ह्यूम साहेबांनीं आपल्या 'प्रचलित धर्मांतील रत्नभांडार ' अर्थात् 'Treasure House of Living Religions ' या ग्रंथांतील प्रकरण ६ पान २३ ते २६ वर निरनिराळ्या धर्मातील प्रार्थनादिकांचें महत्व व श्रेष्ठत्व वर्णन करणारे जे खालीं उध्दृत केलेले निवडक उतारे दिले दिले आहेत त्यावरून स्पष्टपणें वरील गोष्ट सिद्ध होते.

ख्रिश्चनधर्मः " नेहमीं ईश्वराची प्रार्थना करा. The prayer of an upright man exerts a powerful influence

सत्यप्रिय व सात्त्विक मनुष्याच्या प्रार्थनेमुळे त्याचे ठायीं अद्भुत सामर्थ्य येतें; त्याचा सर्वत्र चांगला प्रभाव पडतो." ऋग्वेद व अथर्ववेद यामध्येंही प्रार्थनेचे फायदे व महत्त्व वर्णिलें आहे. जैन धर्मातील उत्तराध्ययन सूत्र २९ व १४ मध्यें प्रार्थनेनें व स्तोत्रें गायिल्यानें सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्र यांची प्राप्ति होते असा उल्लेख सांपडतो. कुराणांतही प्रार्थना हें कर्तव्यकर्म Duty होय; व तें इस्लाम धर्मानुयायांनी करावें. "Be steadfast in Prayer-Verily prayer forbids Sin and wrong" (कुराण २९-४४). जुडिझम मधील साम्स (psalms) मध्यें ईश प्रार्थना करून ईश्वरमय व्हावें असें प्रतिपादिलें आहे. शीख धर्मातील गुरु अर्जुनाच्या प्रार्थनागीतांत म्हटलें आहे

"God's worshippers enjoy His love. What belongs to God belongs to His worshippers जें जें ईश्वराचे आहे तें ते सारे त्याच्या खऱ्या भक्तालाच मिळू शकतें. अर्थात त्याच्या ठायीं असलेले अनंत चतुष्टयादि गुण (सर्वज्ञत्व सर्व शक्तिमत्व वगैरे) या मार्गाला लागून तो स्वत: सर्वज्ञ असे ईशपद-ब्रह्मपद-मिळवितो.

मानसीशास्त्र व उद्धृत केलेल्या कांहीं उताऱ्यावरून ईश स्तुतींचें व प्रार्थनागीतांचें महत्त्व सर्वांच्या चटकन ध्यानांत येईल. श्री. रा. ने. शहा यांनीं अनुवाद केलेल्या तिन्ही सामायिक-पाठांत आत्म्याने कोणती भावना भावावी म्हणजे चिंतन करावें, तसेंच सामायिक करण्याची आवश्यकता वगैरे गोष्टींचें वर्णन फार सुंदर रितीने अत्यंत प्रभावी व प्रासादिक भाषेत केलें आहे.

वैदिक काळापासून तो आजपावेतों या भारत वर्षातील भक्तिमान असे आबालवृद्ध त्या सर्वशक्तिमान व उदार प्रभूची प्रार्थना ज्या निरनिराळ्या नामाभिधानीं व भिन्न भिन्न रूपांनीं करून त्याला जसे त्यांनीं आळविले तशाच प्रकारे श्रीअमितगति आचार्यांनीही आपल्या सामायिक-पाठांतील खालीं दिलेल्या श्लोकांत त्याच अर्थाची प्रार्थना केली आहे ती अत्यंत मननीय आहे.

" यो व्यापको विश्वजनीनवृत्तः
सिद्धो विबुद्धो धुतकर्मबन्धः ।
ध्यातो धुनीते सकलं विकारम्
स देवदेवो हृदये मम स्ताम् ॥ १७ ॥

भक्तिभावानें, प्रेमळ भावनेनें व श्रद्धेनें ईश प्रार्थना करणाऱ्यास अवर्णनीय आनंद, शांति व सौख्य प्राप्त होते. ईशस्तुतींत भक्त रंगला म्हणजे त्याला ऐहिक दुःखाचा, आधि व्याधींचा विसर पडतो. जागतिक महायुद्धामुळें धार्मिक व नैतिक सिद्धांतांचें मूल्यमापन पडत्या भावानें सध्यां करण्यांत येत आहे. धर्मग्लानीच्या या काळांत सामायिक-पाठांतील श्लोकासारखी प्रार्थना गेलें याचे ऐश्वर्यांत दृष्टीनें अत्यंत महत्व आहे. आज तेहत्तीस वर्षांनीं या सामायिक-पाठाची द्वितीयावृत्ती रा. शहांच्या मराठी अनुवादासह प्रसिद्ध करण्यांत श्रीवीरग्रंथमालेचे संपादक कविवर्य आ. भा. मगदूम ( वीरानुयायी ) यांनीं उपयुक्ततेच्या दृष्टीनेंहा औचित्य दाखविले आहे. या प्रदीर्घ कालावधींत दोन जागतिक महायुद्धें झालीं तरीहि सामायिक पाठाच्या मुळाशी असलेलीं शाश्वत अशीं नैतिक तत्वें व मूल्य तसेंच धर्मसिद्धांत हीं अबाधित राहिलीं आहेत

सामायिक पाठांतला पवित्र संदेश आबालवृद्ध स्त्री पुरुषांत सर्वत्र पसरून त्याप्रमाणें माझ्या देश बांधवांकडून वर्तन होवो हीच माझी सदिच्छा व ईशचरणीं प्रार्थना आहे.

मी जैनश्रावक वा त्यागी नसतांनाही मला ही प्रस्तावना लिहिण्याची सुसंधि दिल्याबद्दल रा. शहा यांचे अंतःकरणपूर्वक आभार मानणे प्राप्त आहे. शहा हे पूर्णपणे उदारमतवादी ( Catholic ) व लोकसंग्राहक वृत्तीचे आहेत. वृत्तीनें व व्यासंगानें ते साहित्यिक असल्यामुळें त्यांचे अंगी वाङ्मयांत व धर्मांत जें जें सर्वोत्कृष्ट व आदर्श असेल त्याची वाहवा करण्याचा व तत्संबंधी आदर दाखविण्याचा त्यांचा जन्मजात स्वभाव आहे. चालू काळांतल्या गेल्या तीन दशकांतील त्यांच्या साहित्यविषयक व्यासंगयुक्त परिश्रमामुळें व वाङ्मयप्रेमी वाग्भट मित्रमंडळींशीं आपला असलेला संबंध सतत वृध्दिंगत करण्याच्या इच्छेमुळेंच त्यांचे अंगीं वर निर्दिष्ट केलेले गुण आले हें उघड

आहे. गेल्या कित्येक वर्षांचे माझे त्यांचें वाङ्मय क्षेत्रांतलें मित्रत्वाचें नातें असल्यामुळेंच मी हें अनुभवानें सांगूं शकतो. श्री. शहांचा वकीलीचा पेशा जरी असला तरी त्यांनीं आपलें सारें आयुष्य वाङ्मय व संस्कृति यांची यशस्वी रितीनें वकीली करण्यांत व्यतीत केलें आहे. व यामुळेंच ज्या वांचकांना–मग ते जैन असोत वा अजैन असोत–श्रेष्ठ असे सद्विचार–नीतिपर उपदेश–अत्यंत मूल्यवान वाटतो, अशा सुबुद्ध जनतेकरितां सामायिक पाठां-तील थोर व पवित्र विचारांचे महत्व स्पष्टपणें दाखविणारी वरील प्रस्तावना लिहिण्यास मी उद्युक्त झालों.

१-८-४५ } आपला,
टिळक-जयंति } प. कृ. गोडे क्यूरेटर पुणें.

# नव्या आवृत्तीसंबंधीं दोन शब्द.

अनादि कालापासून जैनधर्म व जैनसंस्कृति यांवर परधर्मियांनीं आक्रमण केलें आहे, पण या सर्वांशीं तोंड देऊन हा धर्म व संस्कृति जी टिकून राहिली आहे त्याचें कारण तर्कशुद्ध तत्वज्ञान व निर्दोष धर्मसिद्धांत हेंच होय. जैनधर्मांतील सर्व श्रेष्ठ अहिंसा तत्व सर्व प्राणीमात्रांचे कल्याण करणारें आहे असे विचारी लोकांना कबूल करणें भाग पडलें. गेल्या दोन महायुद्धामुळें दुनियेतील आचार विचारांत महान् क्रांती झाली आहे. पण या सामायिक पाठाच्या मूळाशीं असलेली अध्यात्मिक मूल्यें अबाधितच आहेत.

या सामायिक पाठास आंतरराष्ट्रीय कीर्ती मिळविलेले वाङ्मयतपस्वी प्रा. पी. के. गोडे M. A. यांनीं सुंदर प्रस्तावना लिहून पाठविली याबद्दल मी त्यांचा कायमचा ऋणीच राहूं इच्छितो.

श्रीवीरग्रंथमालेचे उत्साही संस्थापक व जैन वाङ्मय प्रसारक कविवर्य श्री. आ. भा. मगदूम यांनीं या पुस्तकाची द्वितीयावृत्ति प्रसिद्ध केल्याबद्दल त्यांचे हार्दिक आभार मानतो.

सोलापूर–अनंत १४ | रावजी नेमचंद शहा
श्री वीर संवत २०७१ | वकील.

# वाङमयमहर्षि श्री अमितगति आचार्य.

परमारवंशावतंस महाराजा मुंज हे सुविख्यात भोज राजाचे चुलते होत. या मुंज राजाच्या कारकीर्दीत आमचे चरित्रनायक आचार्य अमितगतिसूरी होऊन गेले. खुद्द अमितगतींनीच आपल्या 'सुभाषितरत्नसंदोह' या नीतिशास्त्रावरील ग्रंथाच्या प्रशस्तींत या गोष्टीचा उल्लेख केला आहे त्यावरून त्याचा कालनिर्णयही होऊ शकतो.

' समारूढे पुतत्रिदशवसतिं विक्रमनृपे। सहस्रे वर्षाणाम प्रभवतीहि
पंचदशाधिके ॥ सिते पक्षे पौषे बुधहितमिदं शास्त्रमनघम ॥ '

अर्थात् विक्रमादित्य स्वर्गाला गेल्यानंतर म्हणजे विक्रमसंवत १०५० ( इसवी सन ९९४ ) च्या पौष शुद्ध पक्षाला मुंज राजा पृथ्वीवर राज्य करीत असतांना हा पवित्र शास्त्रग्रंथ आचार्य अमितगतींनी लिहिला. सुभाषित रत्नसंदोह त्यांनी मुंजराजाच्या राजधानी उज्जयनी एथेच समाप्त केला. मुंजराजानंतर त्यांचे पुतणे महाराजा भोजदेव यांना विक्रमसंवत १०७८ मध्यें माळव्यांतील धारानगरी येथें राज्याभिषेक झाला. भोजराजाला तत्कालीन जनता कलिकाल चक्रवर्ती या नावानें संबोधित असे. यावरून अमितगति कवि हे दहाव्या शतकाच्या उत्तरार्धात म्हणजे अकराव्या शतकाच्या पूर्वार्धांत होऊन गेले हें स्पष्टपणे सिद्ध होते. या श्लोकांतील संवताशीं संबंध असणारा विक्रमशब्द हा विक्रमादित्यनृप अशा अर्थाचा आहे. असें प्रथम निःसंदिग्धपणें लिहिलें. भोजराजाच्या पदरीं जे अनेक कविरत्नें व जे धर्मग्रंथकार होऊन गेले त्या सर्वांत अमितगति, धनंजय व धनपाल यांना अग्रेसरत्वाचा मान होता असें दिसतें.

जैनइतिहाससंशोधक पंडित नाथूराम प्रेमजी यांनी ज्ञानार्णवांत शुभचंद्राचार्यांचें चरित्र दिलें आहे. त्यांत ते म्हणतात:—" विश्वभूषण आचार्यकृत भक्तामरचरित्राच्या भूमिकेवरून समजतें की भर्तृहरि, भोज, शुभचंद्र व मुंज हे समकालिन होऊनगेले, तसेच मानुतंग वररुचि व धनंजय हे शुभचंद्रांचे वेळीच होऊन गेले " यावरून दहाव्या व अकराव्या शतकांत अमितगतिसूरिसारख्या अतुलविद्यावाचस्पति अशा अनेक कविरत्नांची व त्यांचा योग्य असा गुणगौरव करणाऱ्या राजाधिराजांची परंपरा होऊन गेल्यामुळें तें वाङमयीन युग भरतखंडांत सुवर्णाक्षरांनी

लिहिण्यास योग्य असेंच होऊन असें म्हणावें लागेल. या आचार्यांचा विश्वविद्यालयांतून नेमण्यास योग्य असा सुभाषितरत्नसंदोह हा ग्रंथ कोण-त्याहि पंथाच्या व धर्माच्या अनुयायांना आपल्याच धर्मसंस्थापकानें लिहिला असला पाहिजे इतकी आपुलकी वाटावयास लावील असा चित्ताकर्षक व सर्वांगसुंदर आहे. या संदोहांत ९२२ संस्कृत श्लोक असून हिंदी व मराठी भाषेंत त्याच्या अनेक आवृत्त्या निघाल्या आहेत. जर्मन भाषेंतही याचा अनुवाद मि. आर. श्मिट व हर्टेल ( Schmidt and Hertel ) साहेबांनीं केला आहे. यांतील सुभाषितें प्रभावी दिलखेचक आहेत.

अमितगति आचार्यांची गुरुपरंपरा पुढीलप्रमाणें दिसून येते. हे माथुर संघांतील वीरसेन आचार्यांच्या परंपरेतील होत.

१ वीरसेन २ देवसेन ३ नेमिषेण ४ माधवसेन ५ अमितगति (चरित्रनायक) प्रा. वेलणकृत जिनरत्नकोषांतही सुभाषितरत्नसंदोहासंबंधीं महत्वाचे उल्लेख आढळतात ( पान ४४६ )

२ धर्मपरीक्षाः—यानंतर अत्यंत महत्वाचा परीक्षणपद्धति शिकविणारा त्यांचा अमूल्य ग्रंथ म्हणजे धर्मपरीक्षा होय. याची रचना विक्रमसंवत १०७० मध्यें झाली. अन्यधर्मांतील दोषस्थळें दाखवितांना केलेला हृदयस्पर्शी, सात्विक विनोद, मार्मिक कोट्या, यथार्थ दृष्टांत आणि युक्ति व तर्क यालाच प्राधान्य देऊन केलेलें विवेचन आस्तिक व नास्तिक वाचकांनाही पटून हा ग्रंथ निरीक्षणार्थ वाटतो

३ योगसारः—हा आचार्यांची तृतीय महान्कृति होय. परमात्मपदप्राप्ती-साठीं मुमुक्षूंनीं या ग्रंथाचें मनन केल्यास आत्मस्वरूपाची यथार्थ जाणीव होईल. योगमार्गावर झगझगीत प्रकाश पाडणारा हा अत्युत्कृष्ट प्रदीप आहे.

४ पंचसारः— वि. सं. १०३० मध्यें याची रचना झाली आहे. हा ग्रंथ गद्य व पद्यमय आहे. गोम्मटसार या प्राकृत ग्रंथाची ही जवळ जवळ संस्कृत रचनाच होय.

५ श्रावकाचारः— हा ग्रंथ उपासकाचार या नांवानेंही प्रसिद्ध आहे. आचार्यांच्या आदर्श व पवित्र अशा आचारविचारामुळें हा ग्रंथ अतबाह्य सुंदर झाला आहे.

याशिवाय भावनाद्वात्रिंशति, चंद्रप्रज्ञप्ति व बृहत्सामायिकपाठ वगैरे

ग्रंथ लिहिले आहेत. याच सामायिक पाठाचें आम्ही भाषांतर केलें आहे. या सामायिक पाठाचें मनन जैनसमाज सदैव करीत आहेच, पण यापुढें प्रा. गोड्यासारख्या आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या चिकित्सक साहित्यिकानें या पाठाचें महत्त्व व अजैन समाजालाही पटवून दिलें आहे. त्यांच्या सदिच्छेला मान देऊन सर्वांनीच या पाठांत दिलेल्या संदेशाप्रमाणें वर्तन केल्यास जगाचें खरेंखुरें कल्याण होईल. विश्वबंधुत्व, समता, स्वातंत्र्य, आणि मानवता वगैरे सर्व त्यांतच सांठविलेली आहेत. परस्परोपयोगी धर्ममतांत आचार्यांच्या संदेशांत प्रस्तुत सारख्या महायुद्धें व तज्जनित होणारें भीषण हत्याकांड थांबविण्याचें प्रभावी सामर्थ्य आहे. याबद्दल कोणालाही शंका वाटण्याचें कारण नाहीं.

इतर जैनाचार्यांप्रमाणेंच या आचार्यांच्या मातापितरांचा कुलाचा किंवा गृहस्थजीवनाचा नामनिर्देशही यांच्या किंवा इतर आचार्यांच्या ग्रंथांतही कांहीं उल्लेख आढळत नाहीं. लौकिक जीवनाचा अनुल्लेख करण्यांत प्रसिध्दि-पराङ्मुखता तर प्रामुख्यानें दृष्टोत्पत्तीस येते, ज्ञानमय जीवन हेंच त्यांचें उज्वल ध्येय. 'अंतर्बाह्य' प्रशमतेनें अहर्निश ज्ञानार्जन हाच त्यांची दैनंदिन क्रिया, आत्मज्ञान करून, ऊर्ध्व स्वतः परमात्मस्वरूपाशीं विलीन होऊन आत्मानंदांत ज्ञानानंदांत तन्मय होऊन जाणें हीच त्यांची जीवनदृष्टी. वीतराग वृत्तीनें संपूर्ण प्राणिमात्राशीं मैत्रीभाव ठेवून रजस्तमांत गुरफटलेल्या व दुःखमय जीवन सुखी करण्याकरितां त्याग व तप ठेवणें हेच आंतरिक उत्कट भावना जैनमुनींच्या ठायीं चारित्र्यांत स्पष्टपणें प्रतीत होत असे.

शेवटीं या जैनधर्मी दिगंबर आचार्यांच्या सुभाषित रत्नसंदोहांतील गोड असें उपदेशामृत मुमुक्षुंपुढें नम्रपणें येथें सादर केल्याशिवाय आम्हांस राहवत नाहीं.

जहत विषयसंगं ज्ञानसंगं कुरुध्वम् ।
अमितगतिनिवासं येन नित्यं लभध्वम् ॥

अर्थात्:-इंद्रियांच्या विषयांचा त्याग करून ज्ञानानंदांत तल्लीन हो; म्हणजे कालांतरानें सर्वज्ञत्व येऊन-ज्ञानी होऊन तुला आवडणारें असें मोक्ष-धाम प्राप्त होईल; किंवा चतुर्गतींत अनंत कालपर्यंत भ्रमण करण्याचें कायमचें टळून, अमितगति आचार्यांनीं जें स्थान प्राप्त करून घेतलें तेंच पद-निर्वाण-तुलाहि लाभेल. सामायिक-पाठांतील हाच दिव्य व महनीय संदेश होय.

# सामायिक-पाठ.

विधीसह-सार्थ

भाषांतरकार

साहित्यचंद्र रावजी नेमचंद शहा, सोलापूर

प्रकाशक

आ. भा. मगदूम,

संपादक, श्रीवीरग्रंथमाला, सांगली.

मुद्रणस्थळ:—

श्री मुद्रणालय, सांगली.

द्वितीयावृत्ति ] सन १९४५. [ किंमत ४ आणे

# प्रस्तावना.

प्रत्येक प्राणिमात्राची सगळी खटपट सुखासाठीं चालली आहे. सर्वांना सुख पाहिजे, हेंच सर्वांचें ध्येय आहे. आपणांला दुःख व्हावें अशी कोणीही इच्छा करीत नाहीं. दुःखासाठीं कोणाचे नवस नसतात. अहोरात्र सुखाचीच धडपड चालली असतांना दुःखाची प्राप्ती का? जेथे सुख आहे तेथे तें न शोधितां भलत्याच जागी जीव सुखाचा शोध करतो, हेंच दुःखाचें कारण होय.

संसारी जीवाला खरें व शाश्वत सुख फक्त मोक्ष प्राप्तीपासूनच प्राप्त होतें, ही गोष्ट निर्विवाद आहे. मोक्षप्राप्ती होण्यास परिणाम शुद्ध असण्याची आवश्यकता आहे. जेव्हां एखादा प्राणी राग द्वेषादि षड्रिपूंच्या स्वाधीन न होतां, आपले कषाय मंद करून आत्मचिंतवन करण्याचा अभ्यास करूं लागतो तेव्हा त्याचे परिणाम शुद्ध होण्यास प्रारंभ झाला असे म्हटले पाहिजे. जैनागमात परिणाम शुद्धीस अत्यंत महत्व दिलें आहे. जैनाचार्यांनी परिणामाचें श्रेष्ठत्व ठिकठिकाणीं प्रतिपादन केलें आहे. भगवज्जिनसेनाचार्य आपल्या सर्वश्रेष्ठ महापुराण ग्रंथांत म्हणतात—

कारणं परिणामः स्याद्बंधने पुण्यपापयोः ॥

म्हणजे पुण्य व पाप यांच्या बंधनाला कारण चित्ताचे शुभाशुभ परिणाम होत. भगवज्जिनसेनाचार्यांचे शिष्य गुणभद्राचार्य यांनीही आपल्या आत्मानुशासन ग्रंथात म्हटले आहे—

परिणाममेव कारणमाहुः खलु पुण्यपापयोः प्राज्ञाः ।
तस्मात् पापापचयः पुण्योपचयश्च सुविधेयः ॥ २३

अर्थ—पुण्य व पाप यांचे कारण परिणाम आहेत. याकरितां पापांचा नाश व पुण्यांचा संचय करणेंच योग्य आहे.

यावरून परिणामाचें श्रेष्ठत्व कोणाच्याही सहज ध्यानांत येईल. आत्म्याचे समतारूप परिणाम होण्यास प्रत्येक प्राणिमात्रानें सामायिक करणें

अत्यंत आवश्यक आहे. सामायिक केल्यानें हृदय नेहमीं शुद्ध, उदात्त व वात्सल्ययुक्त होतें. अत्यंत प्राचीन काळीं आदितीर्थंकर ऋषभदेव यांनी किंवा सुमारें अडीच हजार वर्षांपूर्वीं भगवान् महावीर यांनीं ही जी सामायिक क्रिया आपल्या दिव्य वाणींतून निरूपिली ती केवळ आम्हां जैनांकरितांच नाहीं, तर या जगातील संपूर्ण प्राणिमात्राकरितां निरूपण केलो आहे, आणि ह्मणूनच आम्ही प्रत्येकांनीं सामायिक करणें आवश्यक आहे. आमच्या समाजांतील कुपमंडुक वृत्तीच्या कांहीं अप्रबुद्ध लोकांनीं जैनधर्मांतील किल्ला लाकून ठेवून जैनधर्माचें आजपर्यंत अपरिमित नुकसान केलें आहे. वस्तुतः जैनधर्म हा प्राणिमात्रांचा धर्म आहे. जैनधर्मांतील उदात्त तत्वें विश्वांतील संपूर्ण प्राणिमात्रांना उद्देशून निरूपिलीं असल्यामुळें त्यांसच विश्वधर्म ह्मणतां येईल.

जीवाची व्याख्या श्रीमद्भट्टाकलंकांनीं अशी केली आहे—

यो विश्वं वेद वेद्यं जननजलनिधेर्भंगिनः पारदृश्वा ।
पौर्वापर्याविरुद्धं वचनमनुपमं निष्कलंकं यदीयम् ॥
तं वन्दे साधुवन्द्यं सकलगुणनिधिं ध्वस्तदोषद्विषन्तम् ।
बुद्धं वा वर्धमानं शतदलनिलयं केशवं वा शिवं वा ॥

संसाररूपी सागराच्या पलीकडे ज्याची दृष्टी पोहोंचते, ज्यांची वचनें परस्पर अविरुद्ध, अनुपम व निर्दोष आहेत, जो गुणनिधान, साधूंनाही वंद्य व आठरा दोषांना जिंकलेला आहे, असा जो महात्मा त्याला माझा नमस्कार असो, मग तो बुद्ध असो, वर्धमान असो, विष्णु असो किंवा शंकर असो. त्याचप्रमाणें षट्दर्शनसमुच्चयकार हरिभद्रसूरी हेही असेंच ह्मणतात–

नमे भ्राता महावीरो न द्वेषाः कपिलादिषु ।
युक्तिमद्वचनं यस्य तस्य कार्यः परिग्रहः ॥

ह्मणजे–महावीर कांहीं माझा बंधु नाहीं किंवा कपिलादिक हेही कोणी माझे शत्रु नाहींत, युक्तिवादाला धरून ज्यांचें वचन आहे त्यांची बाजू मला मान्य आहे.

यावरून जैनधर्माचें विश्वव्यापित्व अथवा विश्वबंधुत्व कोणाच्याही सहज ध्यानीं येईल.

अशा उदात्त तत्वांचा व एकेकाळीं भूमंडळावर चोहोंकडे व्यापलेला जैनधर्म ! पण त्याची स्थिति आज अनुकंपनीय झाली आहे. 'आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः" या गीता उक्तीप्रमाणें आमचें आम्हीच त्याला कारण आहोत. त्याकरितां संकुचित व आत्मविघातक दृष्टी टाकून विश्वव्यापी व उदात्त दृष्टी धरली पाहिजे. स्याद्वादवारिधी पं. गोपालदासजींनीं म्हटल्याप्रमाणे आमचा धर्म हा विशिष्ट जातीचा वा पंथाचा नसून संपूर्ण प्राणिमात्रांचा आहे व याप्रमाणें आपली उदात्त भावना बनण्यासाठीं आपण सर्वांनीं सामायिक करणें इष्ट आहे. ही क्रिया कोणत्याही धर्माच्या लोकांनीं आचरली तरी सर्व मानव गुप्टात समता, बंधुभाव, वात्सल्य, दया इत्यादि श्रेष्ठ विकार जागृत होऊन सर्व प्राणिमात्रांचें कोटकल्याण होईल.

या पुस्तकातील पहिला पाठ भगवान् अमितगति आचार्यांचा आहे. त्याचें मराठी भाषांतर ब्र. शीतलप्रसादजी यांनीं केलेल्या हिंदी भाषांतराच्या साह्यानें केलें आहे. दुसरा पाठ स्याद्वादभूषण पं. कल्लापा भरमापा निटवे यांच्या क्रियामंजरी ग्रंथांतून घेतला आहे.

या पाठांचें चिंतवन केल्यापासून प्राणिमात्रांच्या हृदयाला चिरकाल शांति व शाश्वत सौख्य प्राप्ती होईल. म्हणून प्रत्येकानीं याचा अभ्यास करावा- अशी नम्र विनंती करतों.

हें पुस्तक वाचून व तपासून काहीं उपयुक्त सूचना केल्याबद्दल श्री. ता. ने. पागळ, श्री. जीवराज गौतमचंद दोशी व श्री. रावजी सखाराम दोशी यांचे व प्रकाशक श्री. सखाराम नेमचंद यांचे आभार मानून ही प्रस्तावना पुरी करतों.

श्रीवीर निर्वाण संवत २४३९ }<br>
सन १९१२ इ. }

रावजी नेमचंद शहा सोलापूर

# सामायिक व तें करण्याचा विधि.

---

श्रावकांचीं जीं बारा व्रतें सांगितलीं आहेत त्यांत शिक्षाव्रतामध्यें सामायिक सांगितलें आहे. सामायिक शब्दाची व्युत्पत्ति अशी आहे. सम-एकरूप होऊन अयः—स्वरूपामध्यें गमन, समाय. समाय हेंच ज्याचें प्रयोजन तें सामायिक. एकरूप होऊन स्वरूपामध्यें मिळून जाणें याला समय म्हण-तात, व समय हेंच ज्याचें प्रयोजन त्याला सामायिक म्हणतात. सकाळ, संध्याकाळ व मध्यान्ह या तीन्हीं काळीं अमुक वेळपर्यंत बसण्याची प्रतिज्ञा करून तितका वेळ एकांत ठिकाणीं, निरुपद्रव स्थळीं, एकाग्रतेनें व प्रसन्न चित्तानें विश्वांतील संपूर्ण प्राणिमात्रांवरील रागद्वेषादि विकार सोडून समता भावना धरणें व सात्विक, शुद्ध व पवित्र विचार मनांत आणून सर्वज्ञ प्रभूंच्या गुणांचें चिंतवन करणें, धर्मध्यानांत चित्त लावणें, यालाच जैनधर्मीय पारिभाषिक शब्दांत 'सामायिक' म्हणतात.

ज्याप्रमाणें मुनींना नित्य त्रिकाल सामायिक करण्याची जरूरी आहे त्याप्रमाणें अगारी (गृहस्थी) श्रावकांनांही नित्य सामायिकाची जरूरी आहे. तृतीय प्रतिमाधारी श्रावकांना नित्य त्रिकाल जघन्य दोन घटका प्रत्येक वेळीं सामायिक करणें योग्य आहे. सामायिकाचा मध्यम काल ४ घटका व उत्कृष्ट ६ घटका आहे. तृतीय प्रतिमाधारी श्रावकांच्या खालच्या श्रेणीतील श्रावकांना शक्त्यनुसार अथवा इच्छेनुसार सामायिकाचा अभ्यास करतां येतो. अशा अभ्यासू श्रावकानें कमीत कमी एकवेळां सामायिक केलें तरी चालते. त्याला वेळ काळाचें फारसें बंधन नाहीं.

श्रावकांचीं जीं षट्कर्में सांगितलीं आहेत त्यामध्यें तप करणें हें सामायिकाच्या आधीन आहे. अर्थात् तप हें सामायिकानें घडत अस-ल्यामुळें श्रावकांनीं सामायिक जरूर केलें पाहिजे. भगवान् समंतभद्राचार्यांनीं सामायिक करणाऱ्या माणसाची योग्यता त्यावेळीं यतीसारखी असते, असें म्हटलें आहे.—

**सामायिके सारंभाः परिग्रहा नैव संति सर्वेपि।**
**चेलोपसृष्टमुनिरिव गृही तदा याति यतिभावम्‌॥ १०२॥**

( रत्नकरंड श्रावकाचार )

अर्थ–सामायिकाच्यावेळीं गृहस्थाला सर्व परिग्रह आणि आरंभ वर्ज असतात. त्यामुळें तो त्यावेळीं वस्त्रानें गुंडाळलेल्या मुनीसारखा यतिपणाला प्राप्त होतो. अर्थात् मुनीपेक्षा वस्त्राच काय ते याला जास्तीचें असतें.

जेथें डास मच्छरादिकांपासून त्रास होत नाहीं, थंडी उष्णतेची बाधा नाहीं, स्त्रियांचे अथवा नपुंसकाचें येणें जाणें नाहीं, कोणत्याही प्रकारचा गोंगाट नाहीं, अशा एकांत स्थळीं शुद्ध ( स्वादीने ) वस्त्र नेसून बसावें. अशा प्रकारचें स्थळ म्हटले म्हणजे जिनमंदिर, वन, बाग किंवा घरांतील एखादा एकांत प्रदेश होय. प्रातःकालचा वेळ सर्वांत उत्तम होय. सकाळीं उठतांच श्रावक जर स्त्रीसंभोगानीं अशुद्ध नसेल तर प्रातर्विधी आटोपून हात पाय धुवून, वस्त्र अशुद्ध असल्यास बदलून तृणासनावर, दर्भासनावर किंवा चटईवर बसून सामायिक करावें. प्रथम पूर्वेकडे किंवा उत्तरेकडे तोंड करून उभे रहावें, दोन्ही हात सरळ सोडून जोडून पायांच्या पुढील भागांत चार अंगुळें अंतर ठेवावें, केस मोकळे असल्यास बांधून, दृष्टि नासिकाग्रावर दृष्टी ठेवावी. आणि जोंपर्यंत ही सामायिक क्रिया करीन तोंपर्यंत किंवा अमुक वेळपर्यंत मला अन्नस्थान, परिग्रह पंच पापें यांचा त्याग आहे, अशी प्रतिज्ञा करावी. नंतर नऊ किंवा तीन वेळा णमोकार मंत्र म्हणून साष्टांग नमस्कार करावा. पुन्हा उभे राहून ९ किंवा ३ वेळा णमोकार मंत्र म्हणून पूर्व किंवा उत्तर दिशेस दोन्ही हात जोडून तीन आवर्त व एक शिरोनति करावी. ( जोडलेले दोन्ही हात डाव्या बाजूकडून उजवीकडे फिरविणें याला आवर्त म्हणतात. व उभ्यानेंच आपलें मस्तक जोडलेल्या हातावर ठेऊन नमन करणें याला शिरोनति म्हणतात. ) मी मन वचन कायेनें या दिशेकडील समस्त सिद्ध क्षेत्रें, अतिशय क्षेत्रें व कृत्रिम अकृत्रिम जिनमंदिरें यांना नमस्कार करतो. असा वरील दोन्हीं क्रियांचा हेतु आहे. पूर्व किंवा उत्तर दिशेकडे असें केल्यानंतर त्या दिशेच्याच उजव्या बाजूस उभ्यानेंच वळावें, आणि पूर्वीप्रमाणेंच नऊ किंवा तीन वेळां णमोकार मंत्राचा उच्चार करून तीन आवर्त व एक शिरोनति याप्रमाणें चारी दिशेस करावें.

याप्रमाणें चारी दिशेकडे शिरोनति झाल्यानंतर पूर्वी जिकडे तोंड असेल त्याच दिशेकडे तोंड करून पद्मासन घालून बसावें. मांडीवर डाव्या हातावर उजव्या हाताचा तळवा ठेवावा, नंतर शांत चित्तानें व प्रसन्न मन करून, ज्याचा अर्थ आपल्याला समजतो असा संस्कृत किंवा हिंदी पाठ गम्भीरपणानें हळूहळू म्हणावा. अथवा समोर चौरंगावर पुस्तक ठेऊन पाहून म्हणावा. नंतर णमोकार मंत्राच्या एका मालेचा तरी कमीत कमी जप करावा. अर्थात् १०८ जप करावेत. सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान, सम्यक्चरित्र यांच्या स्मरणार्थ आणखी तीन वेळां तो मंत्र म्हणावा. इतकें झाल्या–नंतर शांतपणानें द्वादश अनुप्रेक्षांचें अथवा षोडशकारण भावनांचे किंवा दशलक्षणधर्म, पिंडस्थादि ध्यान किंवा आत्म्याचें चिंतवन करावें. ध्यान संपल्यानंतर पुन्हां उभें राहून कायोत्सर्ग करावा व पुद्गल आणि आत्मा हे भिन्न आहेत असा विचार करून कमीत कमी नऊं वेळां णमो–कार मंत्र म्हणून पहिल्याप्रमाणेंच साष्टांग दंडवत घालावा. याप्रमाणें सामायिकाचा विधी आहे.

सामायिकासाठीं १ योग्य क्षेत्र २ योग्य काल ३ योग्य आसन ४ योग्य विनय ५ मनःशुध्दि ६ वचनशुध्दि ७ कायशुध्दि या सात गोष्टींची अत्यंत आवश्यकता आहे. कारण यांच्याशिवाय मनुष्याचे परिणाम निर्मल व निश्चल राहूं शकत नाहींत. सामायिक करणाऱ्यानें काय चिंतवन करावयाचें याबद्दल समंत भद्राचार्यांनीं असें म्हटलें आहे—

अशरणमशुभमनित्यं दुःखमनात्मानमावसामि भवं।
मोक्षस्तद्विपरीतात्मेति ध्यायंतु सामायिके॥ १०४

भावार्थ—सामायिकाच्या वेळीं असें चिंतवन करा कीं, जेथें कोणी शरण नाहीं आणि पापरूपी, क्षणभंगुर, नाशवंत, दुःखदायक, आत्मस्वरूप–रहित असा संसारांत मी पडलों आहे. आणि मोक्ष जें आहे तें याच्या विरुद्ध स्वरूपाचें आहे. इ.

असो, सामायिक झाल्यानंतर रात्री किंवा दिवसा सामायिकाच्या वेळे–चे जे दोष घडले असतील त्यांचे आलोचन करून किंवा पश्चाताप करून याबद्दल दंड घ्यावा.

॥ श्रीवीतराग प्रसन्न ॥

# सामायिक-पाठ.

( श्री अमितगति आचार्य कृत )

सत्वेषु मैत्री, गुणिषु प्रमोदं, क्लिष्टेषु जीवेषु कृपापरत्वम् ।
माध्यस्थभावं विपरीतवृत्तौ, सदा ममात्मा विदधातु देव ॥ १ ॥

भावार्थ-हे जिनेंद्रदेव ! माझ्या आत्म्यामध्यें कोणत्याही वेळीं खोटे परिणाम उत्पन्न न होवोत अशी माझी इच्छा आहे. वाईट परिणाम नाहीसे होऊन जगांतील सर्व प्राणीमात्रांचें कल्याण व्हावें, असे माझे परिणाम होवोत. एका मित्राचा दुसऱ्या मित्राशीं ज्याप्रकारचा संबंध असतो त्याच प्रकारचा संबंध सर्व प्राणिमात्राशीं राहो, अशी माझी इच्छा आहे. कारण सर्व जीव निश्चयानें विचार केला असतां माझ्या आत्म्यासारखेच आहेत. प्रत्येक जीव चैतन्यगुणधारी असल्यामुळें जाति अपेक्षेनें एकच आहेत. म्हणून त्यांच्याशीं मैत्रीभाव राहो. तसेंच जे पुरुष गुणवान आहेत. अर्थात् जे सम्यग्दर्शन, ज्ञान, चरित्र इत्यादि गुणांनीं विभूषित आहेत, अथवा जे रत्नत्रयमार्गाच्या प्राप्तीमध्यें आपले गुण वाढवीत आहेत, अशा श्रेष्ठ पुरुषांविषयीं माझ्या मनांत प्रमोद अर्थात् हर्षरूपी परिणाम उत्पन्न होवोत. पतिव्रता स्त्रीला आपल्या पतीला पाहून ज्याप्रमाणें आनंद होतो त्याचप्रमाणें मला गुणी जनांना पाहून आनंद होवो. कारण 'गुणाःपूजास्थानं गुणिषु न च लिंगं न च वयः' अर्थात् जगांत गुणांचीच पूजा अथवा महत्व दिसून येतें. कारण आत्मा आपलें अथवा दुसऱ्यांचें कल्याण गुणांनींच करूं शकतो. म्हणूनच गुणी जनांबद्दल माझा आदर वृध्दिंगत होवो. हे प्रभो ! या संसारामध्यें शारीरिक अथवा मानसिक दुःखांनीं जे जीव पीडित झाले आहेत, ज्यांना रोग, शोक, क्षुधा, तृषा आदि विकार झाले आहेत, त्या जीवांविषयीं माझ्या अंतःकरणांत दयाभाव उत्पन्न होवो, त्या दुःखी जीवांचें दुःख शक्य तेवढें कमी करण्याचें सद्विचार माझ्यामध्यें दृढ होवोत.

प्राणि ज्या जीवांचा विरुद्ध वर्तन करणें हाच धर्म आहे, ज्यांचा स्वभाव वेरोधी बनला आहे, अर्थात् जे मिथ्यात्वी व अधर्मी आहेत, अथवा जे माझा अविनय किंवा द्वेष करतात, अशा जीवांबद्दल मी माध्यस्थभाव धरावा. म्हणजे मी त्यांच्याशीं वैरही करूं नये, व द्वेषही करू नये, अशी माझी इच्छा आहे. कारण आपल्या स्वतःचे परिणाम खराब करून व्यर्थ पाप बांधून घेणें हें माझ्यासारख्या समंजसाला योग्य नव्हे.

शरीरतः कर्तुमनन्तशक्तिं विभिन्नमात्मानमपास्तदोषम् ।
जिनेंद्रकोशादिव खड्गयष्टिं तव प्रसादेन ममास्तु शक्तिः ॥ २ ॥

हे भगवन् ! ज्याप्रमाणें म्यानांतून तलवार बाहेर काढतात त्याप्रमाणें माझ्या आत्म्याशीं संबंध ठेवणाऱ्या कार्माण, तैजस व ह्या स्थूल औदारिक शरीरांना आत्म्यापासून वेगळे करण्याचें सामर्थ्य माझ्या आत्म्यामध्यें तुझ्या कृपेनें उत्पन्न होवो. कारण माझा आत्मा निश्चयानें अनंतशक्तिधारी, संपूर्ण दोषरहित, निर्विकार, वीतराग व शुद्ध आहे. ज्याप्रमाणें कमळाचें पान जलापासून वेगळें असतें अथवा पाण्यावर पडलेलें तेल पाण्यापासून वेगळें असतें त्याप्रमाणें जरी माझा आत्मा ह्या सूक्ष्म व स्थूल शरीरामध्यें फैलावलेला आहे, तथापि तो शरीरापासून सर्वथा भिन्न आहे.

दुःखे सुखे वैरिणि बंधुवर्गे, योगे वियोगे भवने वने वा ।
निराकृताशेषममत्वबुद्धेः समं मनो मेऽस्तु सदापि नाथ ॥ ३ ॥

हे नाथ ! सर्व ममत्व भावना सोडून देऊन, माझें मन नेहमीं सुखामध्यें असो वा दुःखामध्यें असो, शत्रूंच्या अथवा मित्रांच्या समूहांत असो, घरांत अथवा वनांत कोठेंही गंभीर होऊन समतारूप राहो.

मुनीश लीनाविव कीलिताविव, स्थिरौ निखाताविव बिंबिताविव ।
पादौ त्वदीयौ मम तिष्ठतां सदा, तमो धुनानौ हृदि दीपकाविव ॥४॥

हे मुनीश्वरा ! अंधःकाराचा नाश करणाऱ्या दीपकाप्रमाणें तुझे चरण-कमल माझ्या हृदयांत सदासर्वदा स्थिर होवोत. जणु काय माझ्या अंतःकरणांत ते लीन झाले आहेत अथवा कीलित झाले आहेत अथवा चित्राप्रमाणें

प्रतिबिंबित झाले आहेत, अशाप्रकारें वास करोत. अर्थात् माझें म
तुझ्या चरणीं सर्वदा लीन होवी.

एकेंद्रियाद्या यदि देव ! देहिनः प्रमादतः संचरता इतस्ततः ।
क्षता विभिन्ना मिलिता निपीडितास्तदस्तु मिथ्या दुरनुष्ठितं तदा ॥

हे जिनेश ! इकडे तिकडे प्रमादपूर्वक चालत असतां माझ्याकडून जर एकेंद्रियादिक प्राण्यांचा नाश झाला असेल अथवा त्यांचे तुकडे केले गेले असतील अथवा त्यांना दुसऱ्या कशामध्यें मिसळले असेल किंवा त्यांना मी पीडा केली असेल तर ते माझें सारें दुष्कृत्य मिथ्या होवो.

विमुक्ति मार्ग प्रतिकूलवर्तिना. मया कषायाक्षवशेन दुर्धिया ।
चारित्रशुद्धेर्यदकारि लोपनं. तदस्तु मिथ्या मम दुष्कृतं प्रभो ॥

हे प्रभो ! मी दुर्बुध्दि आहे. मोक्षमार्गाच्या विरुद्ध चालणारा आहे. मी क्रोध, मान, माया व लोभ या चार कषायांच्या व पांच इंद्रियांच्या स्वाधीन होऊन जर आपलें निर्मल चारित्र्य मलान केलें असेल तर तें माझें सारें दुष्कृत्य मिथ्या होवो.

विनिंदनालोचनगर्हणैरहं मनोवचःकायकषाय निर्मितम् ।
निहन्मि पापं भवदुःखकारणं भिषग्विषं मंत्रगुणैरिवाखिलम् ॥ ७ ॥

ज्याप्रमाणें वैद्य मंत्रसामर्थ्यानें समस्त विष नाहींसें करितो, त्याप्रमाणें मन, वचन, काय व कषाय यांच्या द्वारें संसारदुःखाला कारणीभूत असें जें पाप मी केलें असेल, ते मी आपली निंदा, आलोचना व गर्हा करून नाहींसें करतों.

अतिक्रमं यद्विमतेर्व्यतिक्रमं जिनातिचारं सुचरित्रकर्मणः ।
व्यधादनाचारमपि प्रमादतः प्रतिक्रमं तस्य करोमि शुद्धये ॥ ८ ॥

हे जिनदेव ! विकारबुध्दीनें अथवा प्रमादामुळें आपल्या उत्कृष्ट चारित्रामध्यें जर अतिक्रम, व्यतिक्रम, अतिचार अथवा अनाचार आदि दोष मला लागले असतील, तर त्यांच्या शुध्दीकरितां मी प्रतिक्रमण करतों, अर्थात् पश्चात्ताप करतों.

क्षतिं मनःशुद्धि विधेरतिक्रमं, व्यतिक्रमं शीलव्रतेर्विलंघनम् ।
प्रभोऽतिचार विषयेषु वर्तनं, वदन्त्यनाचारमिहातिसक्तताम् ॥ ९ ॥

हे प्रभो! आचार्य सांगतात की मनःशुध्दिमध्यें क्षति होणें म्हणजे मनांमध्यें विकारभाव उत्पन्न होणें यांस अतिक्रमण म्हणतात. शीलव्रताचें अर्थात् व्रतचर्येचें उल्लंघन करणें यांस व्यतिक्रम म्हणावें. विषयाकडे प्रवृत्त होणें यास अतिचार म्हणतात. आणि विषयाच्या ठिकाणीं अत्यंत आसक्त होणें यांस अनाचार म्हणतात

यदर्थमात्रापदवाक्यहीनं मया प्रमादाद्यदि किंचनोक्तम् ।
तन्मे क्षमित्वा विदधातु देवि । सरस्वती केवलबोधलब्धीम् ॥ १० ॥

हे सरस्वतीदेवी! जर मी प्रमादामुळें अर्थ, मात्रा, पद व वाक्य, यांना सोडून कांहीं कमीजास्त वाक्यें उच्चारलीं असतील तर मला क्षमा व्हावी. आणि मला केवलज्ञानाची प्राप्ती व्हावी.

बोधिः समाधिः परिणामशुध्दिः स्वात्मोपलब्धिः शिवसौख्यसिध्दिः ।
चिंतामणिं चिंतित वस्तुदाने, त्वां वंद्यमानस्य ममास्तु देवि ! ॥ ११ ॥

हे देवी! इच्छित वस्तु देण्यामध्यें तूं चिंतामणि रत्नासारखी आहेस. माझा तुला नमस्कार असो. तुझ्या कृपेनेंच मला रत्नत्रयाचें ज्ञान, आत्मलीनतारूप समाधि, परिणामांची शुद्धता, आत्मस्वरूपाची प्राप्ती व मोक्षसुखाची सिध्दी होवो.

यः स्मर्यते सर्वमुनींद्रवृन्दैः, यः स्तूयते सर्वनरामरेन्द्रैः ।
यो गीयते वेदपुराणशास्त्रैः, स देवदेवो हृदये ममास्ताम् ॥ १२ ॥

ज्या परमात्म्याचें, सर्व मुनिवर्गांचा समूह स्मरण करतो, ज्याची सर्व चक्रवर्ति व इंद्र स्तुति करतात, तसेंच ज्याचा महिमा द्वादशांगरूप वेद, महापुराण व शास्त्र यांमध्ये गाइला आहे, तो देवाधिदेव माझ्या हृदयांमध्यें येऊन विराजमान होवो.

यो दर्शनज्ञानसुखस्वभावः समस्तसंसारविकार बाह्यः ।
समाधि गम्यः परमात्मसंज्ञः, स देवदेवो हृदये ममास्ताम् ॥ १३ ॥

जो अनंतदर्शन, अनंतज्ञान व अनंतसुखरूप स्वभावधारी आहे, जो या संसारांतील समस्त विकारापासून वेगळा आहे, व जो अभेद रत्नत्रयस्वरूप, निर्विकल्पसमाधि (निश्चल ध्यान) याच्यायोगानेंच अनुभव करण्यास योग्य आहे, तसेंच ज्याला परमात्मा अर्थात् उत्कृष्ट आत्मा म्हणतात, तो देवाधिदेव माझ्या अंतःकरणामध्यें येऊन विराजमान होवो.

निषूदते यो भवदुःखजालं निरीक्षते यो जगदन्तरालम् ।
योऽन्तर्गतो योगिनिरीक्षणीयः, स देवदेवो हृदये ममास्ताम् ॥१४॥

जो संसारांतील दुःखसमूहांचा नाश करतो, जो या जगांतील सर्व वस्तूंना पहातो, व जो अंतर्गत (आत्म्यामध्यें वास करणारा) असून योगी-जनांनाच पाहण्यायोग्य आहे, तो देवाधिदेव माझ्या हृदयामध्यें येऊन प्रगट होवो.

विमुक्तिमार्गप्रतिपादको यो, यो जन्ममृत्युव्यसनाद्व्यतीतः ।
त्रिलोकलोकी विकलोऽकलंकः, स देवदेवो हृदये ममास्ताम् ॥१५॥

जो मोक्षमार्गाला दाखविणारा आहे, जो जन्ममरणरूपी आपत्तीपासून दूर आहे, अर्थात् ज्याला जन्ममरणरूपी आपत्ती नाहीत, जो तीन्ही काळाला पाहणारा आहे, जो शरीररहित व कलंकरहित आहे, तो देवाधिदेव माझ्या हृदयामध्ये येऊन विराजमान होवो!

क्रोडीकृताशेषशरीरिवर्गाः रागादयो यस्य न सन्ति दोषाः ।
निरीन्द्रियो ज्ञानमयोऽनपायः, स देवदेवो हृदये ममास्ताम् ॥१६॥

समस्तप्राण्यांना ज्या रागादिविकारांनी क्रोडीकृत करून घेतले आहे. अर्थात् वश करून घेतले आहे, ते रागादि दोष ज्याला नाहीत, जो पांच इंद्रियें व मन यांनीं रहित आहे, तसेंच जो ज्ञानमय व अविनाशी, आहे. तो देवांचा देव माझ्या अंतःकरणांत विराजमान होवो.

यो व्यापको विश्वजनीनवृत्तेः, सिध्दो विबुध्दो धुतकर्मबन्धः ।
ध्यातो धुनीते सकलं विकारं, स देवदेवो हृदये ममास्ताम् ॥ १७ ॥

जो संपूर्ण जगांतील पदार्थांमध्यें आपल्या ज्ञानाच्या अपेक्षेनें व्यापलेला

आहे–अर्थात् ज्याला जगांतील संपूर्ण पदार्थांचें ज्ञान आहे, जो सिद्ध व बुद्ध आहे, ज्याने सर्व कर्मबंधांचा नाश केला, व सर्व भव्य जीव ज्याचे ध्यान करतात, तसेंच जो संपूर्ण विकारांना नाहींसे करतो तो देवांचा देव माझ्या अंतःकरणांत विराजमान होवो !

न स्पृश्यते कर्मकलङ्कदोषैः, यो ध्वांतसंघैरिव तिग्मरश्मिः।
निरंजनं नित्यमनेकमेकं, तं देवमाप्तं शरणं प्रपद्ये ॥ १८ ॥

ज्याप्रमाणें सूर्य किरणांच्या समूहाला अंधकाराच्या समूहाकडून स्पर्श केला जात नाहीं, त्याप्रमाणें परमात्मा हा कर्मकलंकरूपी दोषांकडून स्पर्श केला जात नाहीं. जो परमात्मा कर्मरूपी अंजनानें रहित, वस्तू अपेक्षेनें नित्य, पर्याय अथवा गुणांच्या अपेक्षेनें अनेक, व द्रव्य अपेक्षेनें एक आहे, त्या आप्तदेवाला मी शरण जातो.

विभासते यत्र मरीचिमाली, न विद्यमाने भुवनावभासि ।
स्वात्मस्थितं बोधमयप्रकाशं, तं देवमाप्तं शरणं प्रपद्ये ॥ १९ ॥

ज्याच्यामध्यें लौकिक सूर्याचा अभाव असूनहीं तीन लोकांना प्रगट करणारा ज्ञानसूर्य प्रकाशमान झाला आहे, व जो ज्ञानरूपी प्रकाशानें व्यापक असूनहीं आत्म्यामध्यें स्थिर आहे, त्या आप्तदेवाला मी शरण जातो.

विलोक्यमाने सति यत्र विश्वं, विलोक्यते स्पष्टमिदं विविक्तम् ।
शुद्धं शिवं शान्तमनाद्यनंतं, तं देवमाप्तं शरणं प्रपद्ये ॥ २० ॥

ज्याच्या ज्ञानामध्यें विश्वांतील प्रत्येक पदार्थ आपल्या त्रिकालवर्ती अवस्थासहित स्पष्ट दिसतो, जो शुद्ध, कल्याणरूप, शांत व आदि अंत यांनीं रहित आहे, त्या आप्त देवाला मी शरण जातो.

येन क्षता मन्मथमानमूर्छा–विषादनिद्राभयशोकचिंताः ।
क्षयोऽनलेनेव तरुप्रपञ्चः, तं देवमाप्तं शरणं प्रपद्ये ॥ २१ ॥

ज्याप्रमाणें अग्नी वृक्षसमूहाला भस्म करून टाकतो त्याप्रमाणें ज्या परमात्म्यानें काम, मान, मूर्छा, विषाद, निद्रा, भय, शोक व चिंता यांचा नाश केला त्या आप्तदेवाला मी शरण जातो.

न संस्तरोऽश्मा न तृणं न मेदिनी, विधानतो नो फलको विनिर्मितः
यतो निरस्ताक्षकषायविद्विषः, सुधीभिरात्मैव सुनिर्मलो मतः ॥२२॥

सामायिक करण्याकरितां दगडाच्या, तृणाच्या अथवा पृथ्वीच्या आस-नाची जरूरी नाहीं. तसेंच लाकडी पाटाचेंच आसन असावें असेंही नाहीं. ज्यानें इंद्रियें व कषायरूप शत्रूंचा नाश केला आहे, त्या आत्म्यालाच विद्वानांनी निर्मल मानलेलें आहे. अर्थात आत्मा हा अत्यंत पवित्र व निर्मल असल्यामुळें आत्मचिंतन करीत असतांना त्याला आसनाची आवश्यकता नाहीं.

न संस्तरो भद्र ! समाधिसाधनं, न लोकपूजा न च संघमेलनम् ।
यतस्ततोऽध्यात्मरतो भवानिशं, विमुच्य सर्वामपि बाह्यवासनाम् ॥२३

हे भद्र ! आसन, लोकमान्यता अथवा चतुर्विध संघाची संगति हें वस्तुतः सामायिकाचें अथवा समाधीचें साध्य नव्हे. ह्मणून तूं सर्व बाह्य वासना सोडून देऊन निरंतर आत्म्यामध्यें लीन हो.

न संति बाह्या मम केचनार्था, भवामि तेषां न कदाचनाहम् ।
इत्थं विनिश्चित्य विमुच्य बाह्यं स्वस्थः सदा त्वं भव भद्र मुक्त्यै ॥२४.

माझ्या आत्म्याशिवाय इतर जे कांहीं पदार्थ आहेत, ते माझे नाहींत व मी ही पण त्यांचा होऊं शकत नाहीं. असा निश्चय करून, तूं सर्व बाह्य वस्तूंचा त्याग कर. आचार्य सांगतात. कीं, मोक्षलक्ष्मी प्राप्त व्हावी ह्मणून तू नेहमीं आपल्या आत्मिक स्वभावामध्यें स्थिर हो—तद्रूप हो

आत्मानमात्मन्यविलोक्यमानस्त्वं दर्शनज्ञानमयो विशुद्धः ।
एकाग्रचित्तः खलु यत्र तत्र स्थितोऽपि साधुर्लभते समाधिम् ॥ २५

तूं स्वतःमध्यें स्वतःला पहाणारा, अनुभवणारा अर्थात् स्वयंवेद्य, दर्शनज्ञानमय व विशुद्ध असा आहेस. एकाग्रचित्त झालेला साधु कोणत्याही काळीं व कोणत्याही स्थळीं असला, तरी समाधिप्रत प्राप्त होतो ह्मणजे त्याचे समतारूप परिणाम होतात.

एकः सदा शाश्वतिको ममात्मा विनिर्मलः साधिगमस्वभावः ।
बहिर्भवाः सन्त्यपरे समस्ता-न शाश्वताः कर्मभवाः स्वकीयाः ॥ २६

माझा आत्मा नेहेमी एकाकी, अविनाशी, अत्यंत निर्मल व केवल-ज्ञानस्वरूप आहे. माझ्या आत्म्याच्या बाहेर असणारे संपूर्ण पदार्थ आपल्याच उपादान, कारण अशा कर्मांच्या निमित्ताने झाले आहेत. हे नाशवंत आहेत, अर्थात् त्यांची अवस्था बदलणारी आहे.

यस्यास्ति नैक्यं वपुषापि सार्द्धं, तस्यास्ति किं पुत्रकलत्रमित्रैः ।
पृथक्कृते चर्मणि रोमकूपाः, कुतोहि तिष्ठन्ति शरीरमध्ये ॥२७॥

ज्या आत्म्याची शरीराशीसुद्धा एकता नाही, अर्थात् जो आत्मा शरीराहून अगदी भिन्न आहे, त्या आत्म्याचे पुत्र, मित्र, बायको वगैरे कसे संबंधी होऊं शकतील? शरीरावरील त्वचा काढून टाकल्यानंतर ज्याप्रमाणे त्यावरील रोमरंध्रे राहू शकत नाहीत त्याप्रमाणे आत्म्याचा इतरांशी संबंध रहात नाही.

संयोगता दुःखमनेकभेदं, यतोऽश्नुते जन्मवने शरीरी ।
ततस्त्रिधासौ परिवर्जनीयो यियासुना निर्वृतिमात्मनीनाम् ॥२८॥

संसाररूपी वनामध्ये हा जीव बाह्य पदार्थांच्या संयोगामुळे नाना-प्रकारची दुःखे भोगात आहे. म्हणून आपण दुःखमुक्त व्हावें असे इच्छिणाऱ्या पुरुषाने या संयोगाला मन, वचन, कायपूर्वक सोडून दिले पाहिजे.

सर्वं निराकृत्य विकल्पजालं, संसारकान्तारनिपातहेतुम् ।
विविक्तमात्मानमवेक्षमाणो, निलीयसे त्वं परमात्मतत्वे ॥२९॥

संसाररूपी वनामध्ये भ्रमण करणारे हे सारे संकल्पविकल्पसमूह नाहीसे करून, सर्व पदार्थांहून आपला आत्मा अगदी भिन्न आहे, असे पाहणारा जो तू, तो परमात्मतत्वांच्या विचारामध्ये लवलीन होतोस.

स्वयं कृतं कर्म यदात्मना पुरा, फलं तदीयं लभते शुभाशुभम् ।
परेण दत्तं यदि लभ्यते स्फुटं, स्वयं कृतं कर्म निरर्थकं तदा ॥३०॥

आत्म्याने स्वतः पूर्वी जें कर्म केले आहे, त्याचे शुभाशुभ फल त्याला सध्यां प्राप्त होत आहे. हें शुभाशुभ कर्म दुसऱ्याकडून प्राप्त होतें असें जर मानिलें तर आपण स्वतः केलेले कर्म निरर्थक होईल, हें उघड आहे.

**निजार्जितं कर्म विहाय देहिनो न कोऽपि कस्यापि ददातीति किञ्चन।**
**विचारयन्नेवमनन्यमानसः परो ददातीति विमुच्य शेमुषीम् ॥३१॥**

संसारी जीवाला आपणच केलेल्या कर्मांची फळें भोगावी लागतात. त्याखेरीज इतर कोणी कोणाला कांहींही देत नाहीं, असा विचार करावा. सर्व संकल्प विकल्पाचा त्याग करून एकाच विषयामध्यें ज्याचे चित्त रममाण झाले आहे अशा त्वां, आपली सुखदुःखांची फळें देणारा दुसरा कोणी आहे अशा बुद्धीचा त्याग करावा.

**यैः परमात्माऽमितगतिवन्द्यः, सर्वविविक्तो भृशमनवद्यः।**
**शश्वदधीतो मनसि लभन्ते, मुक्तिनिकेतनं विभववरं ते ॥३२॥**

हे भव्य जीव ! अमितगति अर्थात् अपार ज्ञानवान अशा गणधरादिकांना अथवा अमितगति आचार्यांना ( ग्रंथकर्त्याला ) वंद्य, सर्वांहून भिन्न व अत्यंत प्रशंसनीय अशा परमात्म्याचे निरंतर आपल्या मनामध्ये ध्यान करतात, त्या जीवांना श्रेष्ठ अशी मोक्षलक्ष्मी प्राप्त होते

**इति द्वात्रिंशता वृत्तैः परमात्मानमीक्षते।**
**योऽनन्यगतचेतस्को यात्यसौ पदमव्ययम् ॥३३॥**

जो कोणी भव्य जीव वर सांगितलेल्या ३२ श्लोकांच्या द्वारें एकाग्रचित्त होऊन परमात्म्याचें चिंतवन करतो, तो सर्वश्रेष्ठ अशा निर्वाणपदाची प्राप्ति करून घेतो.

# सामायिक पाठ.

भगवन्नमोऽस्तु ते।

एषोऽहमथ पौर्वाह्निक देववंदना करिष्याम्यथ सामायिक स्वीकारः॥

हे भगवंता, तुला नमस्कार असो. हा मी प्रातःकालसंबंधी देववंदना करितो. प्रथम सामायिकाचा स्वीकार करतों.

सिध्दं संपूर्णभव्यार्थसिध्येः कारणमुत्तमम।
प्रशस्तदर्शनज्ञानचारित्र प्रतिपादिनम् ॥१॥

सुरेंद्रमुकुटाश्लिष्टपादपद्मांशुकेसरम।
प्रणमामि महावीर लोकत्रितयमंगलम् ॥२॥

जगांत भव्य म्हणून जितके आहेत त्या सर्वांचे इष्टार्थ पूर्ण होण्यास कारण असा जगांत श्रेष्ठ, सिद्ध-अर्थात् कृतकृत्य, सम्यग्दर्शन-ज्ञान व चारित्र यांचा उपदेश करणारा, देवेंद्रांच्या किरिटांवर ज्यांच्या चरणारविंदांचे प्रभारूपी केशर चिकटले आहेत, जो त्रैलोक्यास मुख्य मंगल आहे, अशा त्या महावीर प्रभूस मी त्रिकरण शुध्दीने साष्टांग नमस्कार करतों.

सिद्धवन्तु वचोभक्त्या सिद्धान्प्रणमतां सदा।
सिद्धकार्याः शिवं प्राप्ताः सिद्धिं ददतु नोऽव्ययाम ॥३॥

सिद्ध वस्तूची कथा ऐकून जी भक्ति उत्पन्न झाली आहे, तिच्या योगानें सर्वदा सिद्धांस नम्र झालेले जे आम्ही-त्यांना कृतकृत्य झालेले, आणि मोक्षपदास पोचलेले सिद्ध, शाश्वत अशी सिध्दी म्हणजे मोक्षपद देवोत. (सिध्दी आणि साध्य अशा भेदानें वस्तु दोन प्रकारचे आहेत. त्यापैकीं आत्मा हा सिद्धवस्तु होय.)

नमोऽस्तु धूतपापेभ्यः सिध्देभ्य ऋषिपरिषदे।
सामायिकं प्रपद्येऽहं भवभ्रमणसूदनम् ॥४॥

पापरहित अशा सिद्धपरमेष्टींस आणि मुनींच्या समुदायांस माझा नमस्कार असो. आतां, संसारचक्राचा नाश करण्यास समर्थ अशा सामायिकाचा मी स्वीकार करतों.

समता सर्व भूतेषु संयमः शुभभावना ।
आर्तरौद्रपरित्यागस्तद्धि सामायिकव्रतम् ॥५॥

सर्व प्राणिमात्राविषयीं समता असणें ह्मणजे मित्रास व शत्रूसही सारखेच मानणें, किंवा प्राणिमात्रावर दया ठेऊन समान अंतःकरणानें असणें मनाचे परिणाम शुभ ठेवणें, आर्त व रौद्र ध्यान सोडणें अर्थात् धर्मध्यानानें असणें, हेंच सामायिक नांवाचें व्रत होय.

साम्यं मे सर्वभूतेषु वैरं मम न केनचित् ।
आशाः सर्वाः परित्यज्य समाधिमहमाश्रये ॥६॥

मी सर्व प्राण्यांशी समानतेनें वागतो, माझें कोणाशीं वैर नाहीं. आतां देहादिकांची सर्व ममता सोडून मी समाधीचा ह्मणजे शांततेचा अर्थात् रत्नत्रयाची जी पूर्णता तिचा आश्रय करतो.

रागात् द्वेषान्ममत्वाद्वा हा ! मया ये विराधिताः ।
क्षाम्यन्तु जन्तवस्ते मे तेभ्यो मृष्याम्यहं पुनः ॥७॥

कोणत्याही वस्तूच्या प्रीतीमुळें किंवा द्वेषामुळें, किंवा मोहामुळें ज्या ज्या प्राण्यास मी दुखविलें आहे, ते ते सर्व जीव मजवर क्षमा करोत, आणि मी ही त्यावर क्षमा करतो.

मनसा वपुसा वाचा कृतकारितसम्मतैः ।
रत्नत्रयभवं दोषं गर्हे निंदामि वर्जये ॥८॥

मनानें, वचनानें किंवा कायेनें, स्वतः करून, करवून किंवा अनुमोदन देऊन मी रत्नत्रय पाळण्यांत जे अपराध केले असतील त्याबद्दल प्रायश्चित घेऊन स्वतःला तुच्छ समजतो, आणि माझी निंदा करून घेऊन ते दोष न घडू देण्यचा प्रयत्न करतों.

तैरश्चं मानवं दैवमुपसर्गं सहेऽधुना ।
कायाहारकषायादीन्प्रत्याख्यामि त्रिशुध्दितः ॥९॥

मला हें सामायिक करीत असतां, पशु, मनुष्य किंवा देव यापैकीं कोणीही त्रास दिला तरी तो मी सहन करतों, आणि देह, आहार व क्रोध वगैरे कषायांचा त्रिकरण शुध्दीनें तिरस्कार करितों. ह्मणजे त्याविषयीं निस्पृह होतो.

रागं द्वेषं भयं शोकं प्रहर्षौत्सुक्यदीनताः ।
व्युत्सृजामि त्रिधा सर्वामरतिं रतिमेवच ॥१०॥

राग (विषयेच्छा), द्वेष, भय, शोक, हर्ष, औत्सुक्य, दीनता सर्व प्रकारची प्रीती व अप्रीती हे सर्व दोष मी मन, वचन आणि कायेनें सोडून देतो

जीविते. मरणे, लाभेऽलाभे योगे विपर्यये ।
बन्धावरौ सुखे दुःखे सर्वदा समता मम ॥११॥

जगणें, मरणें, लाभ, हानि, संयोग, वियोग, बंधु, शत्रु, सुख व दुःख हे सर्व मला सारखेच आहेत. ह्मणजे याविषयीं मला प्रेमही नाहीं व द्वेषही नाहीं.

आत्मैव मे सदा ज्ञाने दर्शने चरणे तथा ।
प्रत्याख्याने ममात्मैव तथा संवरयोगयोः ॥१२॥

मला सम्यग्ज्ञान, सम्यग्दर्शन व सम्यक्चारित्र हीं प्राप्त होण्यास आत्माच कारण होय। आणि त्याचप्रमाणें देह कषाय वगैरेंचा त्याग करण्यास तसेंच कर्मांचें आगमन होण्यास व त्याच्या प्रतिबंधासही माझा आत्माच कारण होय.

एको मे शाश्वतश्चात्मा ज्ञानदर्शनलक्षणः ।
शेषा बाहिर्भवा भावाः सर्वे संयोगलक्षणः ॥१३॥

ज्ञान आणि दर्शन हें ज्यांचें लक्षण आहे असा माझा आत्मा एक आहे, आणि तो शाश्वत आहे बाकीचे ह्मणजे हे देव कषाय वगैरे सर्व पदार्थ आत्मबाह्य आहेत, अर्थात् आत्म्याहून निराळे आहेत. हे आत्म्याशी संबंधमात्रानें असतात.

संयोगमूलं जीवेन प्राप्ता दुःखपरम्परा ।
तस्मात्संयोगसंबंधं त्रिधा सर्वं त्यजाम्यहम् ॥१४॥

देह, गेह, कषाय वगैरे बाह्य पदार्थांच्या संयोगामुळें या जीवाला एकामागून एक अशीं दुःखें प्राप्त झालीं. म्हणून तीन प्रकारांनें (त्रिकरणानें) त्यांच्या संयोगाचा संबंध मी सर्व सोडून देतों.

एवं सामायिकात्सम्यक्सामायिकमखण्डिम् ।
वर्ततां मुक्तिमानिन्या वशीचूर्णायितं सदा ॥१५॥

याप्रमाणें वर सांगितलेल्या लक्षणाचें जें सामायिकव्रत त्याच्या अनुरोधानें मी करीत असलेलें हें सामायिक मला अखंड (पूर्णपणें) लाभू दे. म्हणजेच यापासून मला फलप्राप्ति होवो. कारण हें व्रत मुक्तिलक्ष्मीस वश करण्याचें जणूं काय एक चूर्णच आहे!

---

# श्री महाचंद्रकृत हिंदी

# सामायिक पाठ.

काल अनंत भ्रम्यो जगमे सहिये दुख भारी।
जन्ममरण नित किये पापको व्है अधिकारी॥
कोटि भवांतरमाहि मिलन दुर्लभ सामायिक।
धन्य आज मे भयो योग मिलियो सुखदायक॥ १॥

पंडित महाचंद्रजी म्हणतात:-हे जिनेश्वरा, अनंत कालपर्यंत या संसारामध्यें भ्रमण करून मी अत्यंत दुःख भोगिलें; निरंतर जन्ममरणाच्या फन्यांत सांपडून पापाचा भागिदार झालों. कोट्यावधि जन्मांत देखील सामायिक करण्याची सुसंधि प्राप्त होणें दुर्लभ आहे. परंतु ती सुखदायक पर्वणी आज मला प्राप्त झाल्यामुळें मी स्वतःस धन्य धन्य समजतों.

हे सर्वज्ञ जिनेश! किये जे पाप जु मै अब।
ते सब मन–वच–काय–योगकी गुप्तिविना लभ॥
आप समीप हजूर मांहि मैं खडो खडो सब।
दोष कहूं सो सुनो करो नठ दुख देहि जब॥ २॥

हे सर्वज्ञ जिनवरा, मनोगुप्ति, वचनगुप्ति व कायगुप्ति या तिहींची प्राप्ती न झाल्यामुळें आजपर्यंत माझ्या हातून पुष्कळ पापें घडली. आतां आपल्या समोर उभा राहून मी ते सर्व दोष निवेदन करतों. हे दयासागरा ते सर्व दुःखकारक असल्यामुळें त्यांचा नाश करा.

क्रोधमानमदलोभमोह मायावशि प्राणी।
दुःखसहित जे किये दया तिनकी नहिं आणि॥
विनाप्रयोजन एकेंद्रियबितियचउपंचेंद्रिय।
आप प्रमादहि मिटे दोष जो लग्यो मोहि जिय॥ ३॥

मी क्रोधाला बळी पडून, मानानें ताठून, मदानें उन्मत्त होऊन, लोभी बनून, मोहाला भुलून व मायेला वश होऊन कारणांवाचून एकेंद्रिय, द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय व पंचेंद्रिय जातीच्या प्राण्यांची हत्या केली, त्यावेळीं यत्किंचितही दया मनांत आणली नाहीं. हाय! त्यांना पीडा दिली व त्यायोगें मला पाप लागलें. हे देवा, तें सर्व तुझ्या प्रसादानें लवकर नष्ट होईल.

आपसमें इकठौर थापि करि जे दुख दीने।
पेलि दिये पगतलें दाबि करि प्राण हरीने॥
आप जगतके जीव जिते तिन सबके नायक।
अरज करूं मैं सुनो दोष मेटो दुखदायक॥ ४॥

आम्ही आपापसांत एकत्र होऊन पुष्कळ प्राण्यांना दुःख दिलें; त्यांना पायाखालीं चिरडून टाकिले, त्यायोगें आम्हांला तीव्रतम असा पापबंध झाला. भो परमात्मन्! आपण त्रैलोक्यांतील सर्व प्राण्यांचे प्रभु आहांत, म्हणून माझ्या सर्व दुःखदायक पापांचें क्षालन करण्याविषयीं मी नम्रतेनें प्रार्थना करितों.

अंजन आदिक चोर महाघनघोर पापमय।
तिनके जे अपराध भये ते क्षमा क्षमा किय॥
मेरे जे अब दोष भये ते क्षमो दयानिधि।
यह पडिकोणो कियो आदि षट्कर्ममांहि विधि॥ ५॥

जिनेश्वर प्रभु! अंजनादिक चोरांनीं अत्यंत घोर अशीं पापकर्में केलीं; तशा दुष्ट अपराध्यांना देखील आपण क्षमा करून पुनीत केलें, मग, हे दयानिधे, माझे अपराधही क्षमा करा. याप्रमाणें मी श्रावकांच्या आवश्यक अशा षट्कर्मांपैकीं प्रथम प्रतिक्रमण केलें.

* *

जो प्रमादवशि होय विराधे जीव घनेरे।
तिनको जो अपराध भयो मेरे अघ ढेरे॥
सो सब झूठो होऊ जगतपतिके परसादै।
जा प्रसाद तें मिलै सर्व सुख दुःख न लाधै॥ ६॥

मी प्रमादवश होऊन पुष्कळ जीवांचा घात केला; त्यायोगें मला फार पाप लागलें. हे जगन्नायका! तें सर्व पाप तुझ्या प्रसादानें मिथ्या होवो. तुझा प्रसाद ज्यांना मिळतो त्यांना सर्व सुखें प्राप्त होतात आणि त्यांचें दुःख नाहींसें होतें.

मैं पापी निर्लज्ज दया करि हीन महाशठ।
किये पाप अघढेर पापमति होय चित्त दुठ॥
निन्दूं हूं मैं बारबार निज जियको गरहूं।
सबविधि धर्म उपाय पाय फिर पापहि करहूं॥ ७॥

मी पापी, निर्लज्ज, निर्दयी व महाठक आहे. दुर्बुद्धी अशा माझ्या-कडून पापबुध्दीनें पातकांच्या राशीच्या राशी केल्या आहेत. त्याबद्दल पश्चात्तापानें मी वारंवार स्वतःची निंदा करतो. आणि माझा जीव खातो. धर्माचीं सर्व साधनें उपस्थित असूनही माझें चित्त धर्ममार्गाकडे न लागतां पापमार्गाकडेच वळत आहे.

दुर्लभ है नरजन्म तथा श्रावक कुलभारी।
सत्संगति संयोग धर्म जिन श्रद्धाधारी॥
जिन वचनामृत धारसमा वर्ते जिनवाणी।
तो हू जीव सधारे धिक् धिक् धिक् हम जाणी॥ ८॥

ह्या चौऱ्यांशी लक्ष योनीमध्यें मनुष्य जन्माची प्राप्ती होणें कठिण आहे. त्यांत श्रावक कुलामध्यें जन्म होणें तर अति दुर्लभ आहे. सत्संगति व जैन धर्मावर श्रद्धा असणें, हें तर त्याहूनही दुर्मिळ. साक्षात् जिनवचनांच्या अमृतधारेप्रमाणें जिनवाणी आहे. अशा प्रकारचा सुसंयोग प्राप्त होऊनही जर मी जीव हिंसेचा त्याग केला नाहीं, तर माझ्या जिण्याला धिक्कार, धिक्कार असो!

इंद्रियलंपट होय खोय निज ज्ञान जमा सब।
अज्ञानी जिम करे तिसी विधी हिंसक व्है अब॥
गमनागमन करंतो जीव विरोधे भोले।
ते सब दोष किये अब निन्दूं मनवच तोले॥ ९॥

पंचेंद्रियांना वश होऊन अर्थात् इंद्रियलंपट होऊन मी स्वतःचें सर्व ज्ञान गमावून बसलो, अज्ञ जनाप्रमाणें हिंसक बनलों, नित्याच्या हालचालींत अनंत जीवांची हिंसा केली. त्या सर्व दोषांबद्दल मी मनवचन कायेनें स्वतःची निंदा करतों.

आलोचनविधि थकी दोष लागे जु घनेरे ।
ते सब दोष विनाश होऊ तुम तें जिन मेरे ॥
बारबार इसभांति मोह मद दोष कुटिलता ।
ईर्षादिक-तें भये निंदये जे भयमाता ॥ १० ॥

हे जिनेश्वरा! आलोचन विधि करतांना जे दोष मला लागले असतील ते सर्व दोष तुझ्या कृपेनें नष्ट होवोत. वारंवार मोह, मद, कुटिलता, मत्सर इत्यादिकांना वश होऊन माझ्या हातून पुष्कळ दुष्कृत्यें घडलीं आहेत. ह्मणून मी स्वतःची निंदा करून घेऊन तें दुष्कृत्य नष्ट होवो. अशी तुझी प्रार्थना करतों.

* * *

सब जीवनमें मेरे समताभाव जग्यो है ।
सब जिय मोसम समता राखो भाव लग्यो है ॥
आर्त रौद्र द्वय ध्यान छांडि करिहु सामायिक ।
संयम मो कब शुद्ध होय यह भाव बधायक ॥ ११ ॥

संपूर्ण प्राणिमात्राविषयीं माझ्या अंतःकरणामध्यें समताभाव जागृत झाला आहे. माझ्याप्रमाणेंच सर्व जीवांनीं समताभाव ठेवावा, अशी माझी इच्छा आहे. आर्त व रौद्र या ध्यानांचा त्याग करून मी सामायिक करतों. हे परमात्मन् शुद्ध परिणामाला वाढविणारा हा संयमभाव माझ्याठायीं केव्हां येईल याचेंच, चिंतवन करितों.

आर्त रौद्र ध्यानांचा त्याग करून, अशुभ परिणाम सोडून, शुभ संयमामध्यें लवलीन होऊन संपूर्ण प्राणीमात्राविषयीं समताभाव राखणें याला सामायिक ह्मणतात.

पृथिवी जल अरु अग्नि वायु चउकाय वनस्पत ।
पंचहि थावरमहि तथा त्रस जीव बसै जित ॥

बेइंद्रिय त्रय चउ पंच इंद्रियमाहिं जीव सब ।
तिनसे क्षमा कराउं मुझपर क्षमा करो अब ॥ १२ ॥

पृथ्वीकाय, जलकाय, अग्निकाय, वायुकाय, व वनस्पतिकाय या पंच-स्थावर जीवांवर तसेंच द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय व पंचेंद्रिय या सर्व त्रस जीवांवर मी क्षमाभाव धारण करतों व तेही मजवर क्षमाभाव धारण करोत.

इस अवसरमें मेरे सब सम कंचन अरु तृण ।
महल समान समान शत्रु अरु मित्रहि सम गण ॥
जामन मरण समान जानि हम समता कीनी ।
सामायिकका काल जितैं यह भाव नवीनी ॥ १३ ॥

यावेळीं मला सर्व वस्तु, उत्तम महाल, स्मशान, शत्रु मित्र, जन्म मरण, तसेंच सोनें, चांदी वगैरे मला समानच आहेत. मी या सर्व वस्तू-विषयीं उदासीन आहे. सामायिक पूर्ण होईतोंवर माझ्या अंतःकरणांत या सर्वांविषयीं समता आहे. अर्थात् बाह्य पदार्थांवरील राग द्वेष सोडून मी आत्म्यामध्यें लवलीन होऊन त्याचें चिंतवन करितों.

मेरो है इक आतम तामें ममत जु कीनो ।
और सबै मम भिन्न जानि समता रस भीनो ।
मात पिता सुत बंधु मित्र तिय आदि सबै यह ।
मोतें न्यारे जानि यथारथ रूप कर्यो गह ॥ १४ ॥

माझा एक आत्माच आहे, त्याच्यावरच मी प्रीति करतों. आत्म्या-शिवाय सर्व पदार्थ भिन्न जाणून मी त्यावर समताभाव धारण करतो. आई, बाप, मुलगा, बंधु, मित्र, बायको वगैरे सर्व माझे नव्हेत असें जाणून माझ्या यथार्थ स्वरूपाचें ग्रहण करितों.

मैं अनादि जगजालमाहिं फँसि रूप न जाण्यो ।
एकेंद्रिय दे आदि जंतुको प्राण हराण्यो ॥
ते सब जीवसमूह सुनो मेरी यह अरजी ।
भवभवका अपराध क्षमा कीजो करि मरजी ॥ १५ ॥

मी अनादिकालापासून संसार मायेमध्यें भ्रमण करीत असल्यामुळें स्वतःचें स्वरूप ओळखलें नाहीं व एकेंद्रियापासून पंचेंद्रिय जीवांचा नाश

केला, त्या सर्व जीवांना माझी विनंति आहे कीं, त्यांनीं मजवर कृपा करून अनेक भवांत मी केलेल्या सर्व अपराधाबद्दल क्षमा करावी.

*　　*　　*　　*

नमो वृषभ जिनदेव अजितजिन जीति कर्मको ।
संभव भवदुखहरण करण अभिनंद शर्मको ॥
सुमति सुमतिदातार तार भवसिंधु पार कर ।
पद्मप्रभ पद्माभ भानि भवभीति प्रीति धर ॥ १६ ॥

आतां मी या स्तवनकार्यामध्यें पूज्य चोवीस तीर्थंकरांचें स्तवन करितों. त्रैलोक्याचा स्वामी, सर्वज्ञ देवाधिदेव अशा प्रथम तीर्थंकराला–श्रीवृषभदेवाला मी भक्तिपूर्वक नमस्कार करितों.

अष्टकर्मांना जिंकून अजिंक्य झालेल्या अजितनाथाला, संसारांतील असंख्य दुःखांचा नाश करणाऱ्या दयानिधि संभवनाथ तीर्थंकराला, सुखदायक त्रिलोकनाथ अभिनंदन तीर्थंकराला, सद्‌बुद्धी देऊन संसारांतून तारून नेणाऱ्या सुमतिनाथाला आणि कमलासारख्या कांतीनें युक्त भवभयाचा नाश करून आत्मप्रीती वाढविणाऱ्या पद्मप्रभ तीर्थंकराला मी अत्यादरानें प्रणाम करितों.

श्रीसुपार्श्व कृतपाश नाश भवजास शुद्धकर ।
श्रीचंद्रप्रभ चंद्रकांतिसम देहकांतिधर ।
पुष्पदंत दमि दोष कोश भविपोष रोषहर ।
शीतल शीतलकरण हरण भवताप दोषहर ॥ १७ ॥

अपार संसारपाशाचा नाश करणाऱ्या व सद्‌बुध्दी देणाऱ्या सुपार्श्व तीर्थंकराला मी नमस्कार करतो. त्याचप्रमाणें चंद्रासारखी ज्याच्या देहाची कांति आहे त्या चंद्रप्रभतीर्थंकराला; अष्ट कर्ममलरहित, पापसमुदाचा नाश करणाऱ्या, भव्यजीवांना पोषक व क्रोध नष्ट करणाऱ्या श्री पुष्पदंत तीर्थंकराला आणि संसार ताप नाहींसा करून, अठरादोष दूर करून, सर्वत्र शांतता करणाऱ्या श्रीशीतलनाथ प्रभूंना माझा प्रणाम असो.

श्रेयरूप जिनश्रेय श्रेय नित सेय भव्यजन ।
वासुपूज्य शतपूज्य वासवादिक भवभयहन ॥
विमल विमलमति देन अंतगत है अनंतजिन ।
धर्म शर्म शिवकरण शांति जिन शांति विधायिन ॥ १८ ॥

नित्य ध्यान करण्यास योग्य, मंगलस्वरूप व भव्य समूहांना वंद्य अशा श्रेयांसनाथ तीर्थकराला मी वंदन करितों. तसेंच शंभर इंद्रांना (भवनवासी ४० इंद्र, व्यंतरवासी ३२ इंद्र, कल्पवासी २४ इंद्र, १ सोमेंद्र, १ रवींद्र, १ मानवेंद्र चक्रवर्ति व १ पशूंचा इंद्र सिंह) पूज्य, भवभीतीचा नाश करणाऱ्या वासुपूज्य तीर्थकराला प्रणाम करितों. निर्दोष बुध्दी देणारा व दयानिधि अशा विमलनाथ तीर्थकराला; अनंतगत ज्याचे ज्ञान आहे म्हणजे प्रत्येक पदार्थाच्या यथार्थ स्वरूपाला जो जाणतो, अशा सर्वज्ञ श्रीअनंतनाथ तीर्थकराला; आणि संपूर्ण कर्मांची शांति करणाऱ्या श्रीशांति जिनेश्वराला माझा प्रणिपात असो

कुंथु कुंथु मुख जीवपाल अरनाथ जालहर ।
मल्लि मल्लसम मोहमल्लमारण प्रचारधर ॥
मुनिसुव्रत व्रतकरण नमत सुरसंघहि नमि जिन ।
नेमिनाथ जिन नेमि धर्मरथमाहिं ज्ञानधन ॥ १९ ॥

कुंथ्वादिक सूक्ष्म प्राण्यांचा रक्षण करणारा, सर्व जीवांचा प्रतिपालक, दयासिंधु कुंथुनाथ तीर्थकराला मी नमस्कार करितों. त्याचप्रमाणें संसारजाल नाहींसे करणाऱ्या व कषायांना स्वाधीन ठेवणाऱ्या श्री अरनाथ तीर्थकराला; मोहरूपी महामल्लास जिंकणारा धैर्यशाली व पराक्रमी मल्ल असा मल्लिनाथ प्रभूला; एक हजार आठ व्रतांचा उत्पादक व सर्व मुनींचा नाथ अशा श्रीमुनिसुव्रत तीर्थकराला; सर्व देव समूहांना वंद्य, त्रिलोकनाथ नमिनाथाला आणि धर्मरूपी रथाचा नेमि, ज्ञानमय, दयाळू अशा श्रीनेमिनाथ तीर्थकराला मी वंदन करितों.

पार्श्वनाथ जिन पार्श्वउपलसम मोक्षरमापति ।
वर्धमान जिन नमूं वमूं भवदुःख कर्मकृत ॥
या विधि मैं जिनसंघरूप चउवीस संख्यधर ।
स्तवूं नमूं हूं बारबार वंदूं शिवसुखकर ॥ २० ॥

हे पार्श्वनाथ ! आपली शरीरकांति चंद्रकांत मण्यासारखी असून आपण मुक्तिलक्ष्मीचे पति आहांत, म्हणून मी आपणांला वंदन करितों.

तीन लोकांचा स्वामी, अठरा दोषरहित असा जो भगवान् महावीरप्रभु त्याला मी नमस्कार करितों.

याप्रमाणें २४ तीर्थंकरांची स्तुति करून त्यांना भक्तिनें वंदन करितो कारण त्यापासून उत्कृष्ट व अविनाशी अशा मोक्षसुखाची प्राप्ती होते.

*　　　*　　　*

वंदूं मैं जिनवीर धीर महावीर सुसन्मति ।
वर्धमान अतिवीर वंदुं मनवच तन कृति ॥
त्रिशला तनुज महेश धीश विद्यापति वंदूं ।
वंदौ नितप्रति कनकरूप तनु पापनिकंदू ॥ २१ ॥

ध्यानामध्ये धीर, आठ कर्में जिंकल्यामुळे वीर, अठरा दोष अथवा आठ कर्मांचा नाश केल्यामुळे महावीर, दिव्यध्वनि द्वारे निर्मल बुध्दि देणारे म्हणून सन्मति, केवलज्ञानाच्या योगानें मोक्षपदाची प्राप्ति झाल्यामुळें वर्ध-मान कामरूपी शत्रूचा नाश केल्यामुळे अतिवीर, अशा सर्वज्ञ वीतरागी, सुवर्णमय शरीरधारी, संपूर्ण विद्येचे अधिपति, असे जे त्रिशलादेवीचे सुपुत्र भगवान् महावीर स्वामी त्यांना मी वंदन करितो.

सिद्धारथ नृपनंद द्वंदुख दोष मिटावन ।
दुरितदवानलज्वलित ज्वाल जगजीव उधारन ॥
कुंडलपुर करि जन्म जगतजिय आनंदकारन ।
वर्ष बहात्तरि आयु पाय सबही दुख टारन ॥ २२ ॥

महामंडलीक, उच्चगोत्रीय महाराजाधिराज सिद्धार्थ महाराजाचे कुल-कमलदिवाकर ( पुत्र ) संसार दुःख समूहांचा नाश करणारे, महाविपत्तिरूपी दावानलामध्यें फसलेल्या जीवांचा उद्धार करणारे, अशा भगवान् महावीर प्रभूंनी कुंडलपूर नगरींत जन्म घेऊन त्या नगरीस पुनीत केलें. त्या महात्म्यांनी बहात्तराव्या वर्षी मुक्तिलक्ष्मीची प्राप्ती करून घेतली. अखिल प्राणिमात्रांचे संपूर्ण दुःख नाहींसे करण्यास वीरप्रभूच समर्थ आहेत.

सप्तहस्त तनु तुंग भंगकृत जन्ममरणभय ।
बालब्रह्ममय ज्ञेय हेय आदेय ज्ञानमय ॥
दे उपदेश उधारि तारि भवसिंधु जीवघन ।
आप बसे शिवमाहिं ताहि वंदौ वच तन ॥ २३ ॥

हे भगवन्! आपला देह सात हात उंच, समचतुरस्र संस्थान, वज्र-वृषभनाराचसंहनन व जन्म, मरण, भय रहित असून देखील आपण बालब्रम्हचारी आहांत. आपण सर्व प्रकारच्या ज्ञानांनीं युक्त–केवल ज्ञानमयच आहांत. दिव्य ध्वनिद्वारा उपदेश करून आपण संसारसागरांतून जीवांना तारणारे आहांत. आपण मुक्तिगृही वास करीत आहात. आपल्या गुणांची स्तुति करून मी मनवच कायेने आपल्याला नमस्कार करतों.

जाके वंदन थकी दोष दुःख दूरिहि जावें ।
जाके वन्दनथकी मुक्तितिय सन्मुख आवै ॥
जाके वन्दनथकी वंद्य होवै सुरगनके ।
ऐसे वीर जिनेश वंदि हूं क्रमयुग तिनके ॥ २४ ॥

ज्या महात्म्याला वंदन केल्यामुळें सर्व दोष व दुःखें दूर होतात, ज्याला नमस्कार केल्यानें मुक्तिरूपी स्त्रीचें प्राणवल्लभ होता येतें; ज्या परमात्म्याला वंदन केल्यानें मनुष्य देवादिकांनांहीं वंद्य होतो, अशा श्रीवीर, महावीर, अतिवीर, वर्धमान जिनप्रभूच्या चरणद्वयाला मी वंदन करितों.

सामायिक षट्कर्ममाहिं वंदन यह पंचम ।
वंदे वीर जिनेंद्र इंद्रशतवंद्य वंद्य मम ।
जन्ममरण भयहरो करो अघशांति शांतिमय ।
मैं अघकोश सुपोष दोषको दोष विनाशय ॥ २५ ॥

सामायिक आदि षट्कर्मामध्यें हें पांचवें वंदन कर्म आहे. त्यामध्यें श्रीमहावीर जिनेंद्र प्रभूला मी नमस्कार करितों. भगवान् महावीर! आपण शंभर इंद्रांना व मला वंदनीय आहांत. हे प्रभू, माझी जन्ममरणाच्या भीती-पासून सुटका करा. माझ्या हातून झालेल्या अपराधांबद्दल मला क्षमा करा.

कां कीं, मी दुर्गुणी व पापांचें माहेरघर आहे. म्हणून हे जिनेश्वरा, माझ्या सर्व दुष्कृत्यांचा नाश होऊं दे.

*  *  *  *

कायोत्सर्ग विधान करू अंतिम सुखदायी ।
कायत्यजनमय होय काय सबको दुखदाई ॥
पूरब दक्षिण नमूं दिशा पश्चिम उत्तर मैं ।
जिनगृहवदन करूं हरूं भवपापतिमिर मैं ॥ २६ ॥

आतां मी शेवटीं सुखदायक असें कायोत्सर्ग विधान करतों. कारण शरीरावरील ममत्व सोडणें अत्यंत सुखकारक आहे व आत्मस्वरूपाहून अत्यंत भिन्न अशा शरीरादिकांवर मोह करणें अतिशय दुःखदायक आहे. या सामायिक विधीप्रमाणें पूर्व, दक्षिण, पश्चिम व उत्तर या चारी दिशेस असलेल्या चैत्य व चैतालयांना मी नमस्कार करितों. कारण त्यामुळेंच संसारांतील पापरूपी अंधःकाराचा नाश होतो.

शिरोनति मैं करूं नमूं मस्तक कर धरिकै ।
आवर्तादिक क्रिया करूं मन वचन मद हरिकै ॥
तीन लोक जिनभवनमाहिं जिन है जु अकृत्रिम ।
कृत्रिम है द्वय अर्द्धद्वीप माहीं बदौं जिम ॥ २७ ॥

मी दोन्ही हात कमलासारखे जोडून मस्तक नम्र करून अत्यंत भक्ति-भावानें चारी दिशांकडील जिन, चैत्य, चैतालय, मंदिर, तीर्थ वगैरेंना शिरोनति (नमस्कार) करितों आणि माझ्या अंतःकरणांतील मन वचन कायेचा अहंकार नाहींसा व्हावा म्हणून चारी दिशेकडे तीन तीन वेळां याप्रमाणें १२ वेळां आवर्त करतो. अर्धद्वीपांतील ( जंबूद्वीप, धातकीद्वीप, व अर्धे पुष्करद्वीप यांतील ) जे कृत्रिम अकृत्रिम जिनालयें आहेत त्यांना भक्तिपूर्वक प्रणिपात करितों.

आठ कोडि परि छपन्न लाख जु सहस सत्याणूं ।
चारि शतक परि असी एक जिनमंदिर जाणूं ॥
व्यंतर ज्योतिषिमाहिं संख्य रहिते जिनमंदिर ।
ते सब वंदन करूं हरूं मम पाप संघकर ॥ २८ ॥

आठ कोटि छप्पन्न लक्ष सत्याणव हजार चारशें एक्याऐंशी (८५६९७४८१) जिनमंदिरें आणि व्यंतर देवांचीं, ज्योतिष देवांचीं जीं असंख्यात् जिनमंदिरें हि येत त्यांना वंदन करितों. कारण त्यामुळेंच माझें सर्व पाप नाहींसें होणार आहे.

सामायिकसम नहिं और कोउ बैर मिटायक ।
सामायिकसम नहिं और कोउ मैत्री दायक ॥
श्रावक अणुव्रत आदि अंत सुतम गुणथानक ।
यह आवश्यक किये होय निश्चय दुःखहानक ॥ २९ ॥

वैर नाहींसें करण्यास सामायिकासारखें दुसरें साधनच नाहीं त्याच-प्रमाणे सामायिकासमागें मैत्रीदायक असेंही दुसरें काहीं नाहीं त्यांचा अभ्यास केल्याने सहनशीलता, धैर्य, उदारता, गंभीरता, विशुद्धता इत्यादि गुणांची प्राप्ति होते म्हणून अणुव्रतधारी श्रावकापासून ते सप्तम गुणस्थानापर्यंतच्या मुनींनी सुद्धा सामायिकाचा अभ्यास करणे अत्यावश्यक आहे. अशा प्रकारच्या या सहा आवश्यक क्रिया केल्यानें दुःखाचा नाश निश्चयानें होतोच.

जे भवि आतमकाज–करण उद्यमके धारी ।
ते सब काज विहाय करो सामायिक सारी ॥
राग दोष मद मोह क्रोध लोभादिक जे सब ।
बुध महाचंद्र बिलाय जाय तातैं कीजो अब ॥ ३० ॥

जे पुरुष या संसारापासून भयभीत होऊन आत्मकार्य करण्यास उद्युक्त झाले आहेत, त्यांनीं सर्व कामें सोडून सामायिक करावें. सामायिकाची क्रिया केल्यानें राग, द्वेष, मद, मोह, क्रोध, लोभ माया व मान इत्यादि-कांचा नाश होऊन अनंत व अविनाशी सुखाची प्राप्ती होते. असें पंडित महाचंद्र म्हणतात. म्हणून नित्य सामायिक करावें.

## श्री वीर ग्रंथ मालेंतील पुढील पुष्प.

# — अहिंसा —

लेखकः— **श्री. बी. बी. पाटील** B. A. LL. B.
वकील **सांगली.**

यांच्या लेखणींतून उतरलेलें हें अत्यंत महत्वाचें पुस्तक ग्रंथमालेच्या वर्गणीदारांना मिळावयाचें आहे. या पुस्तकांत 'अहिंसा' या विषयासंबंधीं सर्व दृष्टीनें सांगोपांग विवेचन केलेलें असल्यामुळें या विषयवरील हें सर्वोत्कृष्ट पुस्तक झालेलें आहे. यांत जैनांची अहिंसा, काँग्रेसची अहिंसा, वैदिकांची अहिंसा इत्यादि प्रकरणें प्राचीन व अर्वाचीन अनेक ग्रंथांच्या आधारानें लिहिलीं असल्यामुळें पुस्तक सप्रमाण झालें आहे. पृष्ठ संख्या ८० किंमत १२ आणे.

---

मालेच्या वर्गणीदारांना मात्र नेहमीच्या वर्गणींतच हें पुस्तक मिळेल. याशिवाय पुढील पुष्प

**पृष्ठ ६४ ] चक्रवर्ति भरत [ किं. ८ आणे**

हें ऐतिहासिक चरित्र त्याच वर्गणींत मिळेल. प्रति मोजक्याच असल्यामुळें वर्गणी लवकर पाठवून नांवें नोंदवा.

**श्रीवीरग्रंथमाला, सांगली.**

# श्रीवीरग्रंथमालेचे हितचिंतक.

१ स्वस्तिश्री जिनसेन भट्टारक पट्टाचार्य महास्वामी, करवीर.

२ दानवीर श्रीमान साहू शांतिप्रसादजी जैन, डालमियानगर.

३ ध. श्रीमान् शेठ सखाराम देवचंद शहा, सोलापूर.

४ ध श्रीमान् पायगोंडा सुरगोंडा पाटील ' कैसर इ हिंद ' समडोळी.

५ श्री. यशवंतराव आप्पाजी मोरे, नांद्रेकर-सांगली.

६ श्री. ध शेठ रामचंद्र सखाराम लेंगरकर, बारामती.

७ श्रीमान शेठ बाबराव एन. रुईकर कोल्हापूर.

३० ,, शेठ शिवलाल मलुकचंद श्री, पंढरपूर.
३१ ,, शेठ मगनलाल नेमचंद गांधी पंढरपूर.
३२ ,, शेठ हुकुमचंद मलुकचंद, पंढरपूर
३३ ,, शेठ हिराचंद पदमशी दोशी, पंढरपूर.
३४ ,, डॉ रामभाऊ गुलाबचंद व्होरा, एम्. बी. बी. एस. पंढरपूर.
३५ ,, शेठ माणिकचंद अमीचंद, बी. ए. सोलापूर.
३६ ,, गुरुनाथ सखाराम रणदिवे, सोलापूर.
३७ ,, जयकुमार रुक्मण्णापा तंगा गुलबर्गा
३८ ,, भरमापा आण्णा पाटील, ब्रास मर्चंट, गुलबर्गा
३९ ,, पद्माण्णा अय्यापा कुणचगी, गुलबर्गा.
४० ,, शेठ हिरालाल गुलाबचंद ह्मसवडकर, निरा
४१ ,, शेठ रावजीभाई हरीचंद शहा, मोडनिंब.
४२ श्रीमती मैनाबाई गुलाबचंद मेहता, अक्कलकोट.
४३ श्री. ए. आर. पांढरे, कुर्डूवाडी.
४४ ,, श्री. शांतगौंडा नरसगौंडा पा. शालिनी स्टोअर्स, कोल्हापूर
४५ ,, शेठ हिराचंद बापूचंद, भूमकर.
४६ ,, आप्पासाहेब मल्लापा कद्दू कुडची
४७ ,, बाबूराव भरमापा ऐनापुरे, कुडची.
४८ ,, ब्रं. जिनदास पाटील, कीर्तनकार

## समडोळी.

४९ श्री. बाबगौंडा भाऊ पाटील
५० श्री आदगौंडा तात्या पाटील
५१ ,, पारीसा बाबाजी मगदूम
५२ ,, नेमीशा बाबाजी मगदूम
५३ ,, आनंदा बाबू आडमुठे
५४ ,, भाऊ भिमा चव्हाण
५५ ,, नाबू दादा आडमुठे
५६ ,, शांता जिन्नापा चव्हाण
५७ ,, नरसापा तात्या लांडे
५८ ,, आण्णा बाबाजी गिड्डु
५९ ,, शिदगौंडा परगौंडा पाटील
६० ,, बापू नेमीशा चिमाणा
६१ ,, नेमाणा आमाणा मोरे
६२ ,, बाबू जिन्नापा चव्हाण
६३ ,, बाबू भिमा चव्हाण
६४ ,, कलगौंडा आण्णा पाटील
६५ ,, बाबू पारीसा खोत
६६ ,, दादा बाबू खोत
६७ ,, शामराव आण्णा चव्हाण
६८ ,, देवगौंडा रामगौंडा पाटील

# जैन साहित्य-सेवा मंडळ, सोलापूर

सोलापूर येथे जैन साहित्य सेवा करण्यासाठीं साहित्यचंद्र श्री. रावजी नेमचंद शहा यांच्या प्रेरणेनें वरील संस्था स्थापन होऊन अल्पावधींतच त्या संस्थेनें जें कार्य केलें आहे तें प्रशंसनीय असेंच आहे.

दे. भ. बाळासाहेब खेर, मुंबई.

दे. भ. पोपटलाल शहा पुणें.

दे. भ. भाऊसाहेब फिरोदिया, नगर.

श्री. काकासाहेब लिमये, पुणें.

प्रॉ. पी. के. गोडे M A. क्युरेटर भांडारकर रि. इं.

वगैरे अनेक विद्वानांनी मंडळाच्या कार्याची स्तुति करून संस्थेचे कार्याध्यक्ष श्री. रा. ने. शहा यांचा गौरव केला आहे.

जैन साहित्यविषयक ज्या अडचणी असतील त्या दूर करण्याचें कार्य ही संस्था यथाशक्ति करीत आहे. साहित्य सेवकांनीं खालील पत्त्यावर पत्रव्यवहार करावा.

पं. विद्याकुमार देवीदास वैद्य

साहित्यरत्न

जैन साहित्य सेवा मंडळ, सोलापूर.